आता भुजांची संख्या स कितीहि असली तरी वरील संबंध (relation) सत्य राहील.

म्हणून स ही संख्या अनंत (infinite) केल्यास बहुभुजांचीं परिमापें जवळजवळ त्यांच्या संवादी (corresponding) वृत्तांच्या परिघांइतकीं होतील.

$$\text{यावरून } \frac{\text{कखगघ ... वृत्ताचा परिघ}}{\text{क'ख'ग'घ'...वृत्ताचा परिघ}} = \frac{\text{मक}}{\text{मक}},$$

$$= \frac{\text{कखगघ... वृत्ताची त्रिज्या}}{\text{क'ख'ग'घ' ... वृत्ताची त्रिज्या}}$$

$$\text{किंवा, } \frac{\text{कखगघ...वृत्ताचा परिघ}}{\text{कखगघ....वृत्ताची त्रिज्या}} = \frac{\text{क'ख'ग'घ' ...वृत्ताचा परिघ}}{\text{क'ख'ग'घ' ....वृत्ताची त्रिज्या}}$$

दोन्ही वृत्तांच्या परिमाणांबद्दल (sizes) कोणताच निर्बंध (restriction) नसल्यामुळे $\frac{\text{वृत्तपरिघ}}{\text{त्रिज्या}}$ ही निष्पत्ति सर्व वृत्तांकरिता एकच असली पाहिजे. व्यास त्रिज्येच्या दुप्पट असतो, म्हणून $\frac{\text{वृत्तपरिघ}}{\text{व्यास}}$ ही निष्पत्तीही स्थिरांक (constant) आहे. हा स्थिरांक प्या या अक्षरानें दर्शविला जातो.

प्याचें मान जवळजवळ $\frac{२२}{७}$ किंवा ३.१४१५९ आहे.

उपसाध्य (corollary):— जर वृत्ताची त्रिज्या त्र असेल, तर

$$\text{परिघ} = २\text{त्र} \times \text{प्या}$$

$$= २\text{प्या त्र}$$

१.५ एका लंबकोनातील भागांची संख्या काढणे.



आ. १.४

म हे कमग वृत्ताचे केंद्र असून त्याची त्रिज्या त्र आहे. तसेच, ∠कमग = ९०° व ∠कमल = १°

आता, वृत्तचापांनी केंद्राशी केलेले कोन त्यांच्या लांबीशी अनुपाती (proportional) असतात.

$$\therefore \frac{\angle \text{कमग}}{\angle \text{कमल}} = \frac{\text{चाप कग}}{\text{चाप कल}}$$

$$= \frac{\frac{१}{४}\text{ परिघ}}{\text{त्रिज्या}} = \frac{\frac{१}{४}(२\text{ प्या त्र})}{\text{त्र}}$$

$$= \frac{\text{प्या}}{२}$$

$$\therefore \quad \angle \text{ कमग} = \left(\frac{\text{प्या}}{२}\right) \angle \text{कमख}$$

$$= \left(\frac{\text{प्या}}{२}\right)^{\text{आ}}$$

म्हणून एका लंबकोणांत $\frac{\text{प्या}}{२}$ आर समाविष्ट होतात.

किंवा, १ आर $= \left(\frac{२}{\text{प्या}}\right) \times$ (१लंबकोण)

पण प्या हा स्थिरांक आहे.

म्हणून १ आर हा अचल कोण आहे.

१·६ एक आर कोणाची महत्ता.

$$१^{\text{आ}} = \frac{२}{\text{प्या}} \times (\text{१लम्बकोण})$$

$$= \frac{२ \times ९०^\circ}{\text{प्या}}$$

$$= १८०^\circ \times (\cdot ३१८३१)$$

$$= ५७^\circ.२९५८$$

$$= ५७^\circ\ १७'\ ४४.८'' \qquad \text{(जवळजवळ)}$$

१·७ पुढील सूत्राच्या (formula) साह्याने आरीय, षाष्टिक व शातिक मापांचे परस्परांत परिवर्तन करतां येते.

$$\frac{\text{प्या}}{२}^{\text{आ}} = ९०^\circ = १००^{\text{श}}$$

ष्या वरील आ हें मूर्धाक्षर सहसा लिहीत नाहीत, पण तें अध्याहृत असतें.

१·८ कोणत्याहि कोनाचें आरीय माप $= \frac{\text{चाप}}{\text{त्रिज्या}}$

कमव हा कोणताहि एक कोन आहे. म हा बिंदु केंद्र व मक त्रिज्या घेऊन एक वृत्त काढा आणि त्याला मक आणि मव ला क आणि व मधे छेदूं द्या. परिघावर चाप कख = त्रिज्या होईल असा ख बिंदु घ्या. मख जोडा.




आ. १·५

यावरून, $\angle$ कमख $= १^{\text{आ}}$

आतां रैखिकीनें,

$$\frac{\angle \text{कमव}}{\angle \text{कमख}} = \frac{\text{चाप कव}}{\text{चाप कख}} = \frac{\text{चाप कव}}{\text{त्रिज्या}}$$

$$\therefore \angle \text{कमव} = \left(\frac{\text{चाप कव}}{\text{त्रिज्या}}\right) \times \angle \text{कमख}$$

$$= \frac{\text{चाप कव}}{\text{त्रिज्या}} \times १ \text{ आर}$$

त्रिज्या, कव चापाची लांबी आणि कमव कोणाचें आरीय माप यांचें अभिधान (notation) क्रमशः त्र, व आणि अ ने केल्यास,

$$अ = \frac{व}{त्र}$$

अथवा $व = त्र.अ$

१·२ उदाहरण १— गोलाच्या (sphere) एकाच ध्रुववृत्तावर (meridian) असलेल्या दोन बिंदूंच्या अक्षवृत्तांतील (latitudes) कोण ३° ७′ ३०″ आहे व त्यांच्यांमधील गोलपृष्ठावर मोजलेलें अंतर ५ प्रांगुल (inch) आहे.

तर $\frac{१}{त्या}$ = ·३१८३१ घेऊन गोलाची त्रिज्या काढा.




आ १·६

क आणि ख हे दिलेले दोन बिंदू ज्या ध्रुववृत्तावर आहेत त्यांतून जाणारा गोलीय छेद (section of the sphere) आकृतींत दाखविला आहे. म हें गोलाचें केन्द्र असून त्र त्याची त्रिज्या आहे.

$$\frac{\text{चाप कख}}{\text{त्रिज्या}} = \angle \text{ कमख मधील आरांची संख्या}$$

आता, चाप कख = ५ प्रांगुल

आणि $\angle$ कमख = ३°७'३०"

$\therefore \frac{५}{त्र} =$ ३°७'३०" मधील आरांची संख्या

$= ३\frac{१}{८}^{\circ}$ मधील आरांची संख्या

$= ३\frac{१}{८} \times \frac{\text{प्या}}{१८०}$

$\therefore त्र = \frac{५ \times ८ \times १८०}{२५ \times \text{प्या}} = २८८ \times .३१८३१$

$= ९१.६७३२८$ प्रांगुल

उदाहरण २— एका त्रिकोणाचे कोण समांतर श्रेढींत (A.P.) असून त्याच्या लघुत्तम कोणांतील आर व महत्तम कोणांतील अंशाक यांची निष्पत्ति प्याः ४०० आहे. तर त्रिकोणाचे कोण अंशांत काढा.

समजा, (य − र)°, य° व (य + र)° हे त्रिकोणाचे कोण आहेत.

आता, त्रिकोणाच्या तीन कोणांचा योग (sum) १८०° असतो.

$\therefore$ (य − र) + य + (य + र) = १८०

किंवा, ३ य = १८०

किंवा, $य = ६०$

म्हणून $(६० - र)^\circ$, $६०^\circ$, $(६० + र)^\circ$ हे त्रिकोणाचे कोण होतील.

$$\text{आता, } (६० - र)^\circ = \left\{ \frac{\text{प्या}}{१८०} (६० - र) \right\} \text{आर}$$

$$\text{आणि } (६० + र)^\circ = \left\{ (६० + र) \frac{१०}{९} \right\}^{\text{ग्रे}}$$

$$\therefore \frac{\frac{\text{प्या}}{१८०}(६० - र)}{(६० + र)\frac{१०}{९}} = \frac{\text{प्या}}{४००}$$

$$\text{किंवा } \frac{\text{प्या}}{२००} \left( \frac{६० - र}{६० + र} \right) = \frac{\text{प्या}}{४००}$$

$$\text{किंवा } २ (६० - र) = ६० + र$$

$$\therefore र = २०$$

$\therefore$ इष्ट कोण $४०^\circ$, $६०^\circ$ आणि $८०^\circ$

## उदाहरणसंग्रह १

(१) ४२ इंच व्यास असलेलें एक वर्तुल बिम्ब (disc) घरंगळत सोडलें. तर बिम्बाच्या एका भ्रमणांत त्याचें केन्द्र किती अंतर जातें तें काढा. $\left(\text{प्या} = \frac{२२}{७}\right)$

(२) एक लहान किडा एका स्थिर (fixed) समांग (uniform) वर्तुलतारेवर चालत आहे. प्रत्येक कलेंत १३२ शतिमान (cms.) या वेगाने तो १७ कलांत तारेभोवती तीन प्रदक्षिणा करतो. तर तारेची त्रिज्या

काढा. $\left(\frac{१}{व्या}=\cdot३१८३१\right)$

(३) दोन नियमित बहुभुजाकृतींच्या भुजांच्या संख्या २:७ या प्रमाणांत असल्यास आणि पहिलीच्या कोणांतील अंश व दुसरीच्या कोणांतील अंशक यांचें प्रमाण ४२:५५ असल्यास त्या आकृतींच्या बाजू किती असल्या पाहिजेत तें काढा.

(४) एका पंचभुजाचे (pentagon) कोण समांतर श्रेढींत असून त्याचा महत्तम कोण लघुत्तम कोणाच्या दुप्पट आहे तर सर्व कोण अंशांत व आरीय मापांत काढा.

(५) (१) २॥ वाजतां, (२) ७ वाजून २० कलांनी, व (३) पावणेदहा वाजतां घड्याळाच्या काट्यांमधे होणारे कोण अंशांत, शतांशांत व आरांत व्यक्त करा.

(६) किती अंतरावर ५ पाद (foot) उंचीचा मनुष्य २०′ कोण आपातित करेल? $\left(\frac{१}{व्या}=\cdot३१८३१\right)$

## प्रकरण दुसरें

## न्यूनकोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती

२.१ यमव हा एक न्यूनकोण असून त्याचें माप अ आहे असें समजा. मव या रेषेंत व हा कोणताहि बिंदु घेऊन व पासून मय वर वभ हा लंब काढा.



आ. २.१

वभम या त्रिकोणांत मव हा कर्ण (hypotenuse) वभ हा लंब (perpendicular) व मभ हा आधार (base) आहे. अ कोणाच्या त्रिकोणमितीय (trigonometrical) निष्पत्तींच्या परिभाषा (definitions) पुढे दिल्याप्रमाणे आहेत.

अ या कोणाची ज्या (sine) किंवा ज्या (अ) $= \frac{\text{भव}}{\text{मव}}$ किंवा $\frac{\text{लंब}}{\text{कर्ण}}$

अ या कोणाची कोटिज्या (cosine) किंवा कोज्या (अ) $= \frac{\text{मभ}}{\text{मव}}$

किंवा $\frac{\text{आधार}}{\text{कर्ण}}$

अ या कोणाची स्पर्शज्या (tangent) किंवा स्प (अ) $= \frac{\text{भव}}{\text{मभ}}$

किंवा $\frac{\text{लंब}}{\text{आधार}}$

अ या कोणाची व्युत्क्रमज्या (cosecant) किंवा व्युज्या अ $= \frac{\text{मव}}{\text{भव}}$

किंवा $\frac{\text{कर्ण}}{\text{लंब}}$

अ या कोणाची व्युत्क्रमकोटिज्या (secant) किंवा व्युत्कोज्या (अ)

$= \frac{\text{मव}}{\text{मभ}}$ किंवा $\frac{\text{कर्ण}}{\text{आधार}}$

अ या कोणाची कोटिस्पर्शज्या (cotangent) किंवा

कोस्प (अ) $= \frac{\text{मभ}}{\text{भव}}$ किंवा $\frac{\text{आधार}}{\text{लंब}}$

या सहा निष्पत्तींशिवाय आणखीहि दोन निष्पत्ती आहेत, परंतु त्यांचा क्वचित्‌च उपयोग होतो. त्या खाली दिल्या आहेत.

अ या कोणाची उत्क्रमज्या (versed sine)

किंवा उज्ज्या (अ) = १ − कोज्या (अ)

अ या कोणाची उत्क्रमकोटिज्या (coversed sine)

किंवा उत्को (अ) = १ − ज्या (अ)

प्रत्येक त्रिकोणमितीय निष्पत्ति दोन आयामांची (lengths) निष्पत्ति आहे. म्हणून सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती संख्यात्मक (numerical) राशी (quantities) आहेत हें लक्षांत ठेवावें.

२.२ त्रिकोणमितीय निष्पत्तींच्या मानांच्या सीमा. वरील अनुच्छेदाच्या (article) आकृतीवरून सहज दिसून येईल कीं, अ कोणाचें मान कांहीहि असलें तरी

भव <मव

तसेंच, मभ < मव

म्हणून कोणत्याहि कोणाची ज्या आणि कोटिज्या १ पेक्षा अधिक असूं शकत नाहीं.

तसेंच, कोणत्याहि कोणाची व्युत्क्रमकोटिज्या आणि व्युत्क्रमज्या १ पेक्षा कमी असूं शकत नाही.

पण भव व मभ यांना स्वतंत्रपणें कांहीहि मान असूं शकतें. त्यामुळें स्पर्शज्या व कोटिस्पर्शज्या यांच्या मानांच्या सीमा (limits) ठरवितां येत नाहीत. त्यांचें मान शून्यापासून (zero) अनन्तापर्यंत (infinity) कोणतेंहि असूं शकतें.

२·३ दिलेल्या कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती नेहमी एकच असतात.



आ. २.२

यमब हा कोणताहि कोण आहे. मब रेषेत ब आणि $ब_1$ हे कोणतेहि दोन बिंदु घ्या आणि, ब आणि $ब_1$ पासून मय रेषेवर बभ आणि $ब_1भ_1$ हे लंब काढा.

आता, बभम आणि $ब_1भ_1म_1$ या त्रिकोणांत म हा कोण साधारण आहे.

आणि ∠ बभम = ∠ $ब_1भ_1म$ = प्रत्येकीं लंबकोण.

∴ बभम व $ब_1भ_1म$ हे त्रिकोण समरूप आहेत.

म्हणून $\frac{बभ}{मब} = \frac{भ_1ब_1}{मब_1}$

अर्थात्, मबवर कोणताहि बिंदु घेतला तरी यमब कोणाच्या ज्येचें मान बदलत नाही.

याचप्रमाणे, बाकीच्या त्रिकोणमितीय निष्पत्तीहि बदलत नाहीत हें दाखवितां येईल.

२·४ व्युत्क्रम संबंध (reciprocal relations) –

२·१ या अनुच्छेदाच्या आकृतीवरून,

ज्या (अ) व्युज्ज्या (अ) = $\frac{मय}{मव} \times \frac{मव}{मय}$

$$= १$$

म्हणून, $\text{व्युज्ज्या (अ)} = \dfrac{१}{\text{ज्या (अ)}}$ (१)

त्याचप्रमाणे, $\text{व्युत्कोज्या(अ)} = \dfrac{१}{\text{कोज्या (अ)}}$ (२)

आणि $\text{कोस्प (अ)} = \dfrac{१}{\text{स्प (अ)}}$ (३)

हें सहज दिसून येईल.

टीप :— यापुढे आपण ज्या (अ), कोज्या (अ), स्प (अ) इत्यादि निष्पत्ती ज्या अ, कोज्याअ, स्प अ, इत्यादि अशा लिहूं.

२.५ मूलभूत ऐकात्म्यें (fundamental identities)— यभम त्रिकोणांत (आकृति § २.१)

$$\angle \text{ मभय} = ९०^{\circ}$$

$$\therefore \text{ मय}^{२} = \text{भय}^{२} + \text{मभ}^{२}$$

या समीकाराला (equation) अनुक्रमें मय², मभ² व भय² नें भागिल्यास,

$$\left(\frac{\text{भय}}{\text{मय}}\right)^{२} + \left(\frac{\text{मभ}}{\text{मय}}\right)^{२} = १ \text{ ............(क)}$$

$$\left(\frac{\text{मय}}{\text{मभ}}\right)^{२} = \left(\frac{\text{भय}}{\text{मभ}}\right)^{२} + १ \text{ ............(ख)}$$

$$\left(\frac{मन}{मय}\right)^२ = १ + \left(\frac{मभ}{मन}\right)^२ \quad \ldots\ldots\ldots\ldots(कि)$$

त्रिकोणमितीय निष्पत्तींच्या परिभाषांवरून व (क) समीकारानुसार,

$$(ज्याअ)^२ + (कोज्याअ)^२ = १$$

$$अथवा,\ ज्या^२\ अ + कोज्या^२\ अ = १ \quad \ldots\ldots\ldots\ldots(४)$$

तसेंच (का) आणि (कि) वरून,

$$व्युत्कोज्या^२\ अ = १ + स्प^२ अ \quad \ldots\ldots\ldots\ldots(५)$$

$$व्युज्ज्या^२\ अ = १ + कोस्प^२\ अ \quad \ldots\ldots\ldots\ldots(६)$$

$$शिवाय,\ \frac{ज्या\ अ}{कोज्या\ अ} = \frac{भय/मय}{मभ/मय} = \frac{भय}{मभ} = स्प\ अ$$

$$अर्थात्\ स्प\ अ = \frac{ज्या\ अ}{कोज्या\ अ} \ldots\ldots \quad \ldots\ldots\ldots\ldots(७)$$

$$तसेंच,\ कोस्प\ अ = \frac{कोज्या\ अ}{ज्या\ अ} \quad \ldots\ldots\ldots\ldots(८)$$

२·६ आता आपण वर सिद्ध केलेल्या मूलभूत ऐकात्म्यांच्या साह्याने कांही उदाहरणें सोडवूं.

$$उदाहरण\ १ — \sqrt{\frac{१ - ज्या\ अ}{१ + ज्या\ अ}}\ \sqrt{\frac{व्युत्कोज्या\ अ + १}{व्युत्कोज्या\ अ - १}} = कोस्प\ अ\left(\frac{१ + कोज्या\ अ}{१ + ज्या\ अ}\right)$$

हें सिद्ध करा.

$$\text{वाम पक्ष} = \sqrt{\frac{१ - \text{ज्या}^२ \text{ अ}}{(१ + \text{ज्या अ})^२}} \sqrt{\frac{(\text{व्युत्कोज्या अ} + १)^२}{\text{व्युत्कोज्या}^२ \text{ अ} - १}}$$

$$= \frac{\text{कोज्या अ}}{१ + \text{ज्या अ}} \times \frac{\text{व्युत्कोज्या अ} + १}{\text{स्प अ}}$$

$$= \frac{१ + \text{कोज्या अ}}{(१ + \text{ज्या अ}) \text{ स्प अ}}$$ (गतानुच्छेदांतील (४) व (५) या सूत्रांनुसार)

$$= \frac{(१ + \text{कोज्या अ})}{(१ + \text{कोज्या अ}) \text{स्प अ}}$$

$$= \text{कोस्प अ} \cdot \frac{(१ + \text{कोज्या अ})}{(१ + \text{ज्या अ})}$$

= दक्षिण-पक्ष (right hand side)

उदाहरण, २— सिद्ध करा :—

$$(१ + \text{कोस्प अ} - \text{व्युज्ज्या अ})(१ + \text{स्प अ} + \text{व्युत्कोज्या अ}) = २$$

$$\text{वाम पक्ष} = \left(१ + \frac{\text{कोज्या अ}}{\text{ज्या अ}} - \frac{१}{\text{ज्या अ}}\right) \times \left(१ + \frac{\text{ज्या अ}}{\text{कोज्या अ}} + \frac{१}{\text{कोज्या अ}}\right)$$

$$= \left(\frac{\text{कोज्या अ} + \text{ज्या अ} - १}{\text{ज्या अ}}\right) \times \left(\frac{\text{कोज्या अ} + \text{ज्या अ} + १}{\text{कोज्या अ}}\right)$$

$$= \frac{(\text{कोज्या अ} + \text{ज्या अ})^{2} - \text{१}}{\text{ज्या अ.कोज्या अ}}$$

$$= \frac{\text{कोज्या}^{2}\text{ अ} + \text{ज्या}^{2}\text{ अ} + \text{२ ज्या अ कोज्या अ} - \text{१}}{\text{ज्या अ . कोज्या अ}}$$

$$= \frac{\text{२ ज्या अ . कोज्या अ}}{\text{ज्या अ . कोज्या अ}}, \text{ सूत्र (४) वरून}$$

$$= \text{२}$$

उदाहरण ३— सिद्ध करा —

$$\text{कोज्या}^{6}\text{ अ} + \text{ज्या}^{6}\text{ अ} = \text{१} - \text{३ ज्या}^{2}\text{ अ } (\text{१} - \text{ज्या}^{2}\text{ अ})$$

$$= \text{१} - \text{३ कोज्या}^{2}\text{ अ } (\text{१} - \text{कोज्या}^{2}\text{ अ})$$

आता, वाम पक्ष = $(\text{कोज्या}^{2}\text{ अ} + \text{ज्या}^{2}\text{ अ}) \times$
$(\text{कोज्या}^{4}\text{ अ} - \text{कोज्या}^{2}\text{ अ ज्या}^{2}\text{अ} + \text{ज्या}^{4}\text{ अ})$

$$= \text{कोज्या}^{4}\text{ अ} - \text{कोज्या}^{2}\text{ अ ज्या}^{2}\text{ अ} + \text{ज्या}^{4}\text{ अ}$$

$$(\because \text{ज्या}^{2}\text{ अ} + \text{कोज्या}^{2}\text{ अ} = \text{१})$$

$$= (\text{कोज्या}^{2}\text{ अ} + \text{ज्या}^{2}\text{ अ})^{2} - \text{३ कोज्या}^{2}\text{ अ ज्या}^{2}\text{ अ}$$

$$= \text{१} - \text{३ ज्या}^{2}\text{ अ } (\text{१} - \text{ज्या}^{2}\text{ अ})$$

$$= \text{१} - \text{३ कोज्या}^{2}\text{ अ } (\text{१} - \text{कोज्या}^{2}\text{ अ})$$

## उदाहरणसंग्रह २

पुढील ऐकात्म्यें सिद्ध कराः—

(१) $\dfrac{\text{ज्या अ} + \text{व्युत्कोज्या अ}}{\text{कोज्या अ} + \text{व्युज्ज्या अ}} = \text{स्प अ}$ [बनारस १९३८

(२) $\text{व्युज्ज्या}^{४} \text{ अ} - \text{कोस्प}^{४} \text{ अ} = १ + २ \text{ कोस्प}^{२}\text{अ}$

(३) $\text{व्युत्कोज्या अ} - \text{स्प अ} = \dfrac{\text{कोस्प अ}}{१ + \text{व्युज्ज्या अ}}$

(४) $\sqrt{\dfrac{\text{व्युत्कोज्या अ} - १}{\text{व्युत्कोज्या अ} + १}} = \text{व्युज्ज्या अ} - \text{कोस्प अ}$

(५) $\dfrac{\text{कोस्प अ} + \text{व्युज्ज्या अ} - १}{\text{कोस्प अ} - \text{व्युज्ज्या अ} + १} = \sqrt{\dfrac{१ + \text{कोज्या अ}}{१ - \text{कोज्या अ}}}$

(६) $\text{कोस्प}^{२} \text{ अ} + \text{कोस्प}^{४} \text{ अ} = \text{व्युज्ज्या}^{४} \text{ अ} - \text{व्युज्ज्या}^{२} \text{ अ}$

(७) $[\text{व्युत्कोज्या}^{२} \text{ अ स्पअ} + २ \text{ व्युत्कोज्या अ व्युज्ज्या अ} + \text{व्युज्ज्या}^{२} \text{ अ कोस्प अ}] = \text{व्युत्कोज्या}^{३} \text{ अ} \times \text{व्युज्ज्या}^{३} \text{ अ}$ [बनारस १९४२

(८) $\dfrac{\text{स्प}^{२} \text{ अ}}{१ + \text{स्प}^{२} \text{ अ}} \cdot \dfrac{१ + \text{कोस्प}^{२} \text{ अ}}{\text{कोस्प}^{२} \text{ अ}} = \text{ज्या}^{२} \text{ अ} \times \text{व्युत्कोज्या}^{२} \text{ अ}$

(९) $\dfrac{१}{\text{व्युत्कोज्या अ} + \text{स्पअ}} - \dfrac{१}{\text{कोज्या अ}}$

$$= \frac{१}{\text{कोज्या अ}} - \frac{१}{\text{व्युत्कोज्या अ} - \text{स्प अ}}$$

(१०) $\text{व्युत्कोज्या अ} + \text{स्प अ} = \frac{१ + \text{ज्या अ}}{\text{कोज्या अ}} = \frac{\text{कोज्या अ}}{१ - \text{ज्या अ}}$

$$= \frac{१ + \text{कोज्या अ} + \text{ज्या अ}}{१ + \text{कोज्या अ} - \text{ज्या अ}}$$

[नागपूर १९३९

(११) $\frac{\text{कोस्प क} - \text{स्प ख}}{\text{कोस्प ख} - \text{स्प क}} = \text{कोस्प क स्प ख}$

(१२) $१ - \frac{\text{ज्या}^२ \text{ अ}}{१ + \text{कोस्प अ}} - \frac{\text{कोज्या}^२ \text{ अ}}{१ + \text{स्प अ}} = \text{ज्या अ कोज्या अ}$

[बनारस १९४३

(१३) $\frac{\text{कोज्या अ}}{१ - \text{स्प अ}} + \frac{\text{ज्या अ}}{१ - \text{कोस्प अ}} = \text{ज्या अ} + \text{कोज्या अ}$

[बनारस १९४५

(१४) $\text{ज्या}^६ \text{ अ} + \text{ज्या}^४ \text{ अ कोज्या}^२ \text{ अ} - \text{ज्या}^२ \text{ अ कोज्या}^४ \text{अ} - \text{कोज्या}^६ \text{ अ} = \text{ज्या}^२ \text{ अ} - \text{कोज्या}^२ \text{ अ}$

(१५) $(\text{कोस्प अ} + \text{व्युज्ज्या अ})^२ = \frac{१ + \text{कोज्या अ}}{१ - \text{कोज्या अ}}$

(१६) $२ \text{ स्प}^२ \text{ अ} = \frac{१}{\text{व्युज्ज्या अ} - १} - \frac{१}{\text{व्युज्ज्या अ} + १}$

[नागपूर १९३९

(१७) $\frac{\text{कोज्या अ}}{१ - \text{ज्या अ}} + \frac{१ - \text{ज्या अ}}{\text{कोज्या अ}} = २ \text{ व्युत्कोज्या अ}$

(१८) $\dfrac{२\ \text{व्युत्कोज्या अ स्प अ} - \text{स्प अ}}{१ - \text{व्युत्कोज्या अ} + \text{व्युत्कोज्या}^{२}\ \text{अ} + \text{स्प}^{२}\ \text{अ}}$
$= \text{ज्या अ}$

(१९) $(\text{स्प क} + \text{व्युज्ज्या ख})^{२} - (\text{कोस्प ख} - \text{व्युत्कोज्या क})^{२}$
$= २\ \text{स्प क कोस्प ख}\ (\text{व्युज्ज्या क} + \text{व्युत्कोज्या ख})$

(२०) जर $\text{स्प अ} + \text{ज्या अ} = \text{म}$
व $\text{स्प अ} - \text{ज्या अ} = \text{न}$ असेल
तर $\text{म}^{२} - \text{न}^{२} = ४\sqrt{\text{मन}}$ हें सिद्ध करा.
[बनारस १९३९

(२१) ज्या अ च्या रूपांत व्यक्त करा :—
$(\text{व्युत्कोज्या अ} - \text{कोज्या अ})\sqrt{\dfrac{१ - \text{ज्या अ}}{१ + \text{ज्या अ}}}$

(२२) व्युत्कोज्या अ च्या रूपांत व्यक्त करा :—
$\text{कोज्या अ} + \dfrac{\text{स्प अ कोज्या अ}}{\text{ज्या अ}} + \dfrac{\text{ज्या}^{२}\text{अ}}{\text{कोज्या}^{२}\text{अ}}$
[बनारस १८९९

२·७ एखाद्या कोणाची कोणतीहि एक त्रिकोणमितीय निष्पत्ति माहीत असल्यास त्या कोणाच्या इतर सर्व निष्पत्ती काढतां येतात.

उदाहरण १— सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती कोटिज्येच्या रूपांत व्यक्त करा.

समजा, कोज्या अ = क्ष

$$\therefore \text{ज्या अ} = \sqrt{१ - \text{कोज्या}^{२}\text{अ}}$$

$$= \sqrt{१ - \text{क्ष}^{२}}$$

$$\text{व्युज्ज्या अ} = \frac{१}{\text{ज्या अ}}$$

$$= \frac{१}{\sqrt{१ - \text{क्ष}^{२}}}$$

$$\text{व्युत्कोज्या अ} = \frac{१}{\text{कोज्या अ}}$$

$$= \frac{१}{\text{क्ष}}$$

$$\text{स्प अ} = \frac{\text{ज्या अ}}{\text{कोज्या अ}}$$

$$= \frac{\sqrt{१ - \text{क्ष}^{२}}}{\text{क्ष}}$$

$$\text{कोस्प अ} = \frac{\text{कोज्या अ}}{\text{ज्या अ}}$$

$$= \frac{\text{क्ष}}{\sqrt{१ - \text{क्ष}^{२}}}$$

उदाहरण २— कोस्प अ $= \frac{३}{\sqrt{७}}$ असल्यास इतर त्रिकोण-

मितीय निष्पत्तींची संख्यात्मक मानें काढा.




आ. २.३

बभम या लंबकोणत्रिकोणांत,

$\angle$ भमब = अ,

भब = $\sqrt{७}$,

व मभ = ३

म्हणून, कोस्प अ = $\dfrac{३}{\sqrt{७}}$

आता, मब = $\sqrt{\text{मभ}^{2} + \text{भब}^{2}}$

= $\sqrt{९+७}$

= ४

$\therefore$ ज्या अ = $\dfrac{\text{भब}}{\text{मब}} = \dfrac{\sqrt{७}}{४}$

आणि व्युज्ज्या अ = $\dfrac{४}{\sqrt{७}}$

स्प अ = $\dfrac{१}{\text{कोस्प अ}} = \dfrac{\sqrt{७}}{३}$

कोज्या अ = $\dfrac{३}{४}$

आणि व्युत्कोज्या अ = $\dfrac{४}{३}$

उदाहरण ३— व्युत्कोज्या अ − स्प अ = $\sqrt{\dfrac{२}{५}}$ असल्यास ज्या अ काढा.

आता, $व्युत्कोज्या\ अ - स्प\ अ = \frac{१ - ज्या\ अ}{कोज्या\ अ}$

$$= \frac{१ - ज्या\ अ}{\sqrt{१ - ज्या^२ अ}}$$

$$= \frac{\sqrt{१ - ज्या\ अ}}{\sqrt{१ + ज्या\ अ}}$$

म्हणून $\sqrt{\frac{१ - ज्या अ}{१ + ज्या\ अ}} = \sqrt{\frac{३}{५}}$

किंवा, $\frac{१ - ज्या\ अ}{१ + ज्या\ अ} = \frac{३}{५}$

$\therefore ८\ ज्या\ अ = २$

किंवा $ज्या\ अ = \frac{१}{४}$

उदाहरण ४— जर $कोस्प\ अ = \frac{क्ष}{ज्ञ}$ असेल तर

$\frac{क्ष\ कोज्या\ अ - ज्ञ\ ज्या\ अ}{क्ष\ कोज्या\ अ + ज्ञ\ ज्या\ अ}$ चे मान काढा.

$$\frac{क्ष\ कोज्या\ अ - ज्ञ\ ज्या\ अ}{क्ष\ कोज्या\ अ + ज्ञ\ ज्या\ अ} = \frac{क्ष\ कोस्प\ अ - ज्ञ}{क्ष\ कोस्प\ अ + ज्ञ},$$

[अंश (numerator) व हर (denominator) यांना ज्या अ ने भागून]

$$= \frac{\text{क्ष}\cdot\frac{\text{क्ष}}{\text{ज्ञ}} - \text{ज्ञ}}{\text{क्ष}\cdot\frac{\text{क्ष}}{\text{ज्ञ}} + \text{ज्ञ}}$$

$$= \frac{\text{क्ष}^{२} - \text{ज्ञ}^{२}}{\text{क्ष}^{२} + \text{ज्ञ}^{२}}$$

## उदाहरणसंग्रह ३

(१) सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती ज्येच्या रूपांत व्यक्त करा.

(२) सर्व निष्पत्ती स्पर्शज्येच्या रूपांत व्यक्त करा.

(३) सर्व निष्पत्ती व्युत्क्रमकोटिज्येच्या रूपांत व्यक्त करा.

(४) ज्या अ आणि कोज्या अ कोस्प अ च्या रूपांत व्यक्त करा.

(५) कोज्या अ आणि कोस्प अ व्युज्ज्या अ च्या रूपांत व्यक्त करा.

(६) एका कोणाची ज्या, $\frac{\text{क्ष}(\text{क्ष}+२\text{ज्ञ})}{\text{क्ष}^{२}+२\text{क्षज्ञ}+२\text{ज्ञ}^{२}}$ आहे. तर त्या कोणाच्या इतर निष्पत्तींचे मान काढा.

[कलकत्ता १८७९.

(७) जर २व्युत्कोज्या अ $= \frac{\text{य}}{\text{र}} + \frac{\text{र}}{\text{य}}$ असेल तर

(व्युज्ज्या अ + कोस्प अ) चें मान काढा.

(८) जर ज्याअ $= \frac{१}{\sqrt{५}}$ असेल तर

$\frac{\text{कोस्प}^२\text{अ} - \text{स्प}^२\text{अ}}{\text{कोस्प}^२\text{अ} + \text{स्प}^२\text{अ}}$ चें मान काढा.

(९) जर स्प अ $= \frac{१}{\sqrt{३}}$ असेल तर

$\frac{\text{व्युज्ज्या}^२\text{अ} - \text{व्युत्कोज्या}^२\text{अ}}{\text{व्युज्ज्या}^२\text{अ} + \text{व्युत्कोज्या}^२\text{अ}} = \frac{१}{२}$ हें दाखवा.

(१०) जर स्प$^२$अ $=$ १ $-$ न$^२$ असेल तर

व्युत्कोज्या अ + स्प$^३$अ व्युज्ज्या अ $= (२ - \text{न}^२)^{\frac{३}{२}}$ हें दाखवा. [बनारस १८९८

## प्रकरण तिसरें

### काही प्रमाप (standard) कोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती

**३·१ लम्बपूरक कोणांच्या निष्पत्ती.**




आ. ३.१

यमव हा कोणताहि एक न्यूनकोण आहे. मव रेषेंत व हा कोणताहि बिंदु घेऊन त्यांतून मय वर वभ हा लंब काढा.

आता वमभ या लंबकोणत्रिकोणांत मवभ हा कोण वमभ या कोणाचा लंबपूरक (complementary) आहे.

म्हणून ∠वमभ = अ असल्यास ∠मवभ = ९०° − अ होईल.

आकृतीवरून,

$$\text{ज्या } (९०^\circ - \text{अ}) = \frac{\text{मभ}}{\text{मव}} = \text{कोज्या अ}$$

$$\text{कोज्या } (९०^\circ - \text{अ}) = \frac{\text{वभ}}{\text{मव}} = \text{ज्या अ}$$

$$\text{स्प } (९०^\circ - अ) = \frac{मम}{मव} = \text{कोस्प अ}$$

त्याचप्रमाणे, व्युज्ज्या (९०° – अ) = व्युत्कोज्या अ,

व्युत्कोज्या (९०° – अ) = व्युज्ज्या अ,

कोस्प (९०° – अ) = स्प अ

हेंहि सिद्ध करतां येईल.

आता आपण नेहमी लागणाऱ्या कांही प्रमाप कोनांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती काढूं.

३.२ ०° च्या निष्पत्ती.

मव या सदिश त्रिज्येने यमव हा अतिशय लहान कोण रेखिला असून मव ची लांबी स्थिर आहे. मय वर यम हा लंब काढा.



आ. ३·२

$$\text{म्हणून ज्या भमव} = \frac{भव}{मव}$$

आता भमव कोण हळूहळू असा लहान करा कीं शेवटीं मव चें मय शीं संपतन (coincidence) होऊन भमव कोण शून्य आणि भव = ० होईल.

$$\text{म्हणून, ज्या}०^\circ = \frac{०}{मव} = ०$$

$$\text{आता, कोज्या भमव} = \frac{मभ}{मव}$$

म्हणून भमव कोण शून्य होतो तेव्हां

$$\text{कोज्या}0^\circ = \frac{\text{मभ}}{\text{मम}} = १$$

$$\text{आणि स्प}0^\circ = \frac{\text{ज्या}0^\circ}{\text{कोज्या}0^\circ}$$

$$= \frac{0}{१}$$

$$= 0$$

$$\text{पण व्युज्ज्या}0^\circ = \frac{१}{\text{ज्या}0^\circ}$$

$$= \frac{१}{0}$$

आता कोणत्याहि परिमित (finito) राशीस अत्यणु (infinitely small) राशीने भागिलें असतां आपणांस अनंताइतकी मोठी संख्या मिळते. ही अनंतराशी $\infty$ या चिन्हाने (symbol) दर्शवितात.

$$\text{म्हणून व्युज्ज्या } 0^\circ = \infty$$

$$\text{पुन्हा व्युत्कोज्या}0^\circ = \frac{१}{\text{कोज्या}0^\circ}$$

$$= \frac{१}{१}$$

$$= १$$

आणि कोस्प $0^\circ = \frac{१}{स्प 0^\circ}$

$= \frac{१}{0}$

$= \infty$

३·२१ ९०° किंवा $\frac{\text{प्या}}{२}$ च्या निष्पत्ती.

0° व ९०° हे कोण लंबपूरक आहेत.

म्हणून ३·१ व ३·२ या अनुच्छेदांवरून,

ज्या ९०° = कोज्या 0°

= १

कोज्या ९०° = ज्या 0°

= 0

स्प ९०° = $\frac{\text{ज्या ९०}^\circ}{\text{कोज्या९०}^\circ}$

$= \frac{१}{0}$

$= \infty$

∴ व्युज्ज्या ९०° = १ ,

व्युत्कोज्या ९०° = ∞ ,

कोस्प ९०° = 0.

अभ्यास :— ९०° कोणाच्या निष्पत्ती रैखिकीने काढा.

३·३ ४५° किंवा $\frac{\text{प्या}}{४}$ च्या निष्पत्ती.




आ ३.३

कखग या लंबकोण समद्विभुज (isosceles) त्रिकोणांत,

$\angle$ ग = ९०°

आणि $\angle$ क = $\angle$ ख = ४५°

समजा कग = खग = का

$$\therefore \text{ कख} = \sqrt{\text{का}^२ + \text{का}^२}$$

$$= \sqrt{२}\text{ का}$$

$$\therefore \text{ ज्या } ४५° = \frac{\text{खग}}{\text{कख}}$$

$$= \frac{\text{का}}{\sqrt{२}\text{ का}}$$

$$= \frac{१}{\sqrt{२}}$$

$$\text{कोज्या } ४५° = \frac{\text{कग}}{\text{कख}}$$

$$\text{स्प } ६०^\circ = \frac{\text{ज्या } ६०^\circ}{\text{कोज्या } ६०^\circ}$$

$$= \frac{\sqrt{३}/२}{१/२}$$

$$= \sqrt{३}$$

आणि, $\text{व्युज्ज्या } ६०^\circ = \frac{२}{\sqrt{३}}$,

$\text{व्युत्कोज्या } ६०^\circ = २$,

$\text{कोस्प } ६०^\circ = \frac{१}{\sqrt{३}}$

३·५ ३०° किंवा $\frac{\pi}{६}$ च्या निष्पत्ती.

३०° व ६०° हे लंबपूरक कोण आहेत.

म्हणून ३·१ व ३·४ या अनुच्छेदांनुसार,

$$\text{ज्या } ३०^\circ = \text{कोज्या } ६०^\circ$$

$$= \frac{१}{२}$$

$$\text{कोज्या } ३०^\circ = \text{ज्या } ६०^\circ$$

$$= \frac{\sqrt{३}}{२}$$

$$\text{स्प } ३०^\circ = \frac{\text{ज्या } ३०^\circ}{\text{कोज्या } ३०^\circ}$$

$$= \frac{१/२}{\sqrt{३}/२}$$

$$= \frac{१}{\sqrt{३}}$$

आणि, व्युज्ज्या $३०^\circ = २$,

व्युत्कोज्या $३०^\circ = \frac{२}{\sqrt{३}}$,

कोस्प $३०^\circ = \sqrt{३}$

अभ्यास:— ३·७ या अनुच्छेदाच्या आकृतीवरून ३०° कोणाच्या निष्पत्ती काढा.

३.६ ०°, ३०°, ४५°, ६०° व ९०° या प्रमाण कोणांच्या निष्पत्ती वारंवार लागतात. त्या खालील सारणीच्या (table) रूपांत एकत्रित केल्या आहेत. ही सारणी विद्यार्थ्यांनी पाठ

फरावी.

| कोण | ०° | ३०° | ४५° | ६०° | ९०° |
|---|---|---|---|---|---|
| ज्या | ० | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{\sqrt{२}}$ | $\frac{\sqrt{३}}{२}$ | १ |
| कोटिज्या | १ | $\frac{\sqrt{३}}{२}$ | $\frac{१}{\sqrt{२}}$ | $\frac{१}{२}$ | ० |
| स्पर्शज्या | ० | $\frac{१}{\sqrt{३}}$ | १ | $\sqrt{३}$ | $\infty$ |
| व्युत्क्रमज्या | $\infty$ | २ | $\sqrt{२}$ | $\frac{२}{\sqrt{३}}$ | १ |
| व्युत्क्रम-कोटिज्या | १ | $\frac{२}{\sqrt{३}}$ | $\sqrt{२}$ | २ | $\infty$ |
| कोटिस्पर्शज्या | $\infty$ | $\sqrt{३}$ | १ | $\frac{१}{\sqrt{३}}$ | ० |

३.६१ उदाहरण १.— सत्यापन करा (verify) :—

$$\text{ज्या } ६०^\circ = \frac{२ \text{ स्प } ३०^\circ}{१ + \text{स्प}^२ ३०^\circ}$$

$$\text{दक्षिण पक्ष} = \frac{२ \cdot \frac{१}{\sqrt{३}}}{१ + \frac{१}{३}}$$

$$= \frac{२}{\sqrt{३}} \times \frac{३}{४}$$

$$= \frac{\sqrt{३}}{२}$$

$$= \text{ज्या } ६०^\circ$$

$$= \text{वाम पक्ष}$$

उदाहरण २— सिद्ध करा :—

$$(\text{कोज्या } ३०^\circ + \text{स्प } ६०^\circ)^२ + (\text{ज्या } ४५^\circ + \sqrt{२}\ \text{कोज्या } ६०^\circ)^२ + (\text{कोस्प } ६०^\circ - \text{कोज्या } ३०^\circ)^२ = \frac{५३}{६}$$

$$\text{वाम पक्ष} = \left(\frac{\sqrt{३}}{२} + \sqrt{३}\right)^२ + \left(\frac{१}{\sqrt{२}} + \sqrt{२} \times \frac{१}{२}\right)^२ + \left(\frac{१}{\sqrt{३}} - \frac{\sqrt{३}}{२}\right)^२$$

$$= \left(\frac{३\sqrt{३}}{२}\right)^२ + \left(\frac{२}{\sqrt{२}}\right)^२ + \left(-\frac{१}{२\sqrt{३}}\right)^२$$

$$= \frac{२७}{४} + \frac{४}{२} + \frac{१}{१२}$$

$$= \frac{८१ + २४ + १}{१२}$$

$$= \frac{१०६}{१२}$$

$= \frac{५३}{६}$

= दक्षिण पक्ष

## उदाहरणसंग्रह ४

(१) सत्यापन करा :—

(१) ज्या ६०° = २ज्या ३०° कोज्या ३०°

(२) कोज्या ९०° = कोज्या²४५° − ज्या²४५°

= २ कोज्या²४५° − १

= १ − २ज्या²४५°

(३) ज्या ३०° $= \sqrt{\frac{१ - \text{कोज्या } ६०°}{२}}$

(४) कोज्या ३०° $= \sqrt{\frac{१ + \text{कोज्या } ६०°}{२}}$

* (२) सत्यापन करा :—

(१) ज्या १३५° = ३ ज्या ४५° − ४ ज्या³४५°

(२) कोज्या १३५° = ४ कोज्या³४५° − ३ कोज्या ४५°

(३) स्प १२०° $= \frac{४ \text{ स्प } ३०° - ४ \text{ स्प}^{३} ३०°}{१ - ६\text{स्प}^{२}३०° + \text{स्प}^{४}३०°}$

---

* पांचवें प्रकरण झाल्यानंतर उदाहरण २ सोडवावें.

(४) कोज्या १२०° $= \frac{१ - स्प^2 ६०°}{१ + स्प^2 ६०°}$

(३) सिद्ध कराः—

(व्युत्कोज्या$^2$ ४५° + व्युज्ज्या$^2$ ६०° + कोस्प$^2$ ३०°)

$= ४$(कोज्या$^2$ ४५° + ज्या$^2$ ६०° + स्प$^2$ ३०°) $= ६\frac{१}{३}$

(४) सिद्ध कराः—

(व्युत्कोज्या ३०° स्प ६०° + ज्या ४५° व्युज्ज्या ४५°

+ कोज्या ३०° कोस्प ६०°) $= \frac{७}{२}$

३.७ सीमेची कल्पना.

$\frac{क}{य}$ हा भिन्न (fraction) विचारांत घ्या. क चें एक विवक्षित स्थिर मान ठेवून य ची महत्ता वदला.

उदाहरणार्थ, $\frac{क}{\frac{१}{१०}} = १०क,$

$\frac{क}{१०००} = १०००क$

इत्यादि.

य जसजसा कमी होईल तसतसें $\frac{क}{य}$ या भिन्नाचें मान

वाढत जाईल हें स्पष्ट आहे. य हा दर पुरेसा लहान घरून $\frac{क}{य}$ या राशींचें मान पाहिजे तितकें वाढवितां येईल. म्हणजे य चें मान जेव्हां शून्याच्या समीप येईल तेव्हां $\frac{क}{य}$ हा मिश्र अनंताइतका मोठा होईल.

हें, य शून्यप्रवृत्त होतो (tends to zero), तेव्हां $\frac{क}{य}$ ची सीमा ∞ होते,
किंवा संक्षेपतः,

$$\underset{य \to 0}{सी}\left(\frac{क}{य}\right) = \infty$$

अशा प्रकारें व्यक्त करतात.

पुन्हा, य ही राशि जर हळूहळू वाढवून शेवटीं अनंताइतकी मोठी केली तर $\frac{क}{य}$ हा मिश्र अल्पणु होईल;

अर्थात् $\underset{य \to \infty}{सी}\left(\frac{क}{य}\right) = 0$

३.८ वृत्तशकलाचें (sector of a circle) क्षेत्रफळ. म हें एका त्र त्रिज्या असणाऱ्या वृत्ताचें केन्द्र असून

$\therefore$ कमख शकलाचें क्षेत्रफळ $= \dfrac{\text{अ}}{२\,\text{प्या}}$

$\times$ (संपूर्ण वृत्ताचें क्षेत्रफळ)

$$= \frac{\text{अ}}{२\,\text{प्या}} \times \text{प्या त्र}^{२}$$

$$= \frac{१}{२}\,\text{अ त्र}^{२}$$

३·२ अ आरीय मापांत आणि $० < \text{अ} < \dfrac{\text{प्या}}{२}$ असेल तर ज्या अ $<$ अ $<$ स्प अ.

त्र त्रिज्या असणाऱ्या एका वृत्ताचें म हें केन्द्र असून कमख हें वृत्तशकल आहे.




आ ३ ६

आकृतीवरून, कमख त्रिकोण हा कमख शकलांत पूर्णपणें समाविष्ट झाला आहे, तसेंच कमख शकलहि मखस त्रिकोणांत समाविष्ट झालें आहे हें दिसून येईल.

म्हणून, △ कमख < शकल कमख < △ मखस

$\therefore \frac{१}{२}$ अ$^{२}$ज्या अ $< \frac{१}{२}$ अ$^{२}$ अ $< \frac{१}{२}$ अ$^{२}$स्प अ

किंवा, $\frac{१}{२}$ अ$^{२}$ने भागून

ज्या अ < अ < स्प अ

३.९१ अ शून्यप्रवृत्त होतो तेव्हां $\frac{\text{ज्या अ}}{\text{अ}}$ आणि $\frac{\text{स्प अ}}{\text{अ}}$ ह्या सीमान्तीं प्रत्येकीं एकासमान होतात.

वरील अनुच्छेदानुसार,

ज्या अ < अ < स्प अ ... ...............(१)

प्रत्येकास ज्या अ ने भागून,

$$१ < \frac{\text{अ}}{\text{ज्या अ}} < \frac{१}{\text{कोज्या अ}}$$

किंवा $१ < \frac{\text{अ}}{\text{ज्या अ}} <$ व्युत्कोज्या अ

अ अल्पणु होतो तेव्हां व्युत्कोज्या अ चें मान १ होतें.

म्हणजेच $\frac{\text{ज्या अ}}{\text{अ}}$ ची सीमा १ होते.

नमॅच (१) ला साद्यंत (throughout) स्प अ ने भागिल्यास,

$$\text{कोज्या अ} < \frac{\text{अ}}{\text{स्प अ}} < १$$

परंतु अ अत्यणु होतो तव्हां कोज्या अ १ होते.

म्हणून $\frac{\text{अ}}{\text{स्प अ}}$ किंवा $\frac{\text{स्प अ}}{\text{अ}}$ ची सीमा १ होते.

हीं फलें (results) सामान्यतः खालील रूपांत लिहितातः—

$$\underset{\text{अ}\to 0}{\text{सी}} \left(\frac{\text{ज्या अ}}{\text{अ}}\right) = १$$

$$\underset{\text{अ}\to 0}{\text{सी}} \left(\frac{\text{स्प अ}}{\text{अ}}\right) = १$$

३·९२ उदाहरण १— अ आरीय मापांत असल्यास

$$\underset{\text{स}\to\infty}{\text{सी}} \left[\text{स ज्या}\left(\frac{\text{अ}}{\text{स}}\right)\right] = \text{अ हें दाखवा.}$$

$$\text{स ज्या}\left(\frac{\text{अ}}{\text{स}}\right) = \text{अ}\cdot\frac{\text{ज्या}\left(\frac{\text{अ}}{\text{स}}\right)}{\left(\frac{\text{अ}}{\text{स}}\right)}$$

$$\therefore \underset{स \to \infty}{\text{सी}} \left[ म \text{ ज्या}\left(\frac{अ}{स}\right) \right] = अ \cdot \underset{स \to \infty}{\text{सी}} \frac{\text{ज्या}\left(\frac{अ}{म}\right)}{\left(\frac{अ}{स}\right)}$$

$$= अ. \underset{\left(\frac{अ}{स}\right) \to ०}{\text{सी}} \frac{\text{ज्या}\left(\frac{अ}{स}\right)}{\left(\frac{अ}{स}\right)}$$

$$= अ. १$$

$$= अ$$

उदाहरण २— ज्या ३०′ चे ठोकळ मान काढा.

$$\text{आता, } ३०' = \frac{१}{२}$$

$$= \left(\frac{\text{प्या}}{१८० \times २}\right)^{\text{आ}}$$

$$\text{ज्या}३०' = \text{ज्या } \left(\frac{\text{प्या}}{३६०}\right)$$

$$= \frac{\text{प्या}}{३६०} \quad \text{जवळजवळ}$$

$$= \frac{३.१४१५९}{३६०}$$

$$= .००८७२६६ \text{ जवळजवळ.}$$

## उदाहरणसंग्रह ५.

ढोबळ मान काढा:—

(१) कोज्या ३०'  (२) ज्या २०'

(३) व्युज्ज्या १०"  (४) व्युत्कोज्या १'

(५) कोस्प ८९°

पुढील समीकार ढोबळ मानाने सोडवा:—

(६) स्प अ = ·०१  (७) ज्या अ = ·००२

(८) अ आरीय मापांत असेल तर

$$\underset{स \to \infty}{सी}\left[स\ स्प\left(\frac{अ}{स}\right)\right] = अ$$ हें सिद्ध करा.

(९) सहा पाद उंचीच्या खांबाने १ क्रोशाक (mile) अंतरावर आपातित केलेला कोण काढा.

(१०) ८० यार्डी (yards) अंतरावर डोळ्यापाशीं २०' चा कोण आपातित करणाऱ्या काठीची लांबी काढा.

## प्रकरण चवथें

# त्रिकोणमितीय निष्पत्तींचीं विचरणें (variations)

४·१ धन आणि ऋण रेषा.




आ ४.१

कोण धन किंवा ऋण कसे असू शकतात हें पहिल्या प्रकरणांत आपण पाहिलें आहे. आता समतलांतील रेषांच्या दिशाहि धन किंवा ऋण कशा असू शकतात हें आपण पाहू.

यमय' व रमर' या दोन रेषा एकमेकांस लम्ब असून म बिंदूंत छेदतात. रूढीनुसार, रर' पासून उजवीकडे जाणाऱ्या व य'य ला समान्तर (parallel) असलेल्या सरळ रेषा धन, आणि रर' पासून डावीकडे जाणाऱ्या व यय' ला समान्तर असलेल्या सरळ रेषा ऋण समजल्या जातात. त्याचप्रमाणे र'र ला समांतर व यय' पासून वर जाणाऱ्या

सरळ रेषा धन आणि रर' ला समांतर व यय' पासून खाली जाणाऱ्या रेषा ऋण समजल्या जातात.

### ४.२ कोणत्याहि कोनाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती·

दुसऱ्या प्रकरणांत आपण न्यूनकोनाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती परिभाषित केल्या. आता आपण कोणत्याहि कोनाच्या













आ. ४.२

यय', रर' हे एकमेकांना लंब असणारे व्यास या वृत्ताचे चार चरणांत विभाग करतात. मय$_1$, मय$_2$, मय$_3$, मय$_4$ या सदिश त्रिज्येच्या चार चरणांतल्या स्थिती आहेत.

यय' वर य$_1$भ$_1$, य$_2$भ$_2$, य$_3$भ$_3$ व य$_4$भ$_4$ हे लम्ब काढा.

पहिल्या चरणांत भ$_1$य$_1$ व मभ$_1$ या दोन्ही रेषा धन आहेत. म्हणून सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती धन आहेत.

दुसऱ्या चरणांत भ$_2$य$_2$ धन आहे, पण मभ$_2$ ऋण आहे. म्हणून ज्या ही, भ$_2$य$_2$ व मय$_2$ या दोन धन राशींची निष्पत्ति असल्यामुळे, धन आहे; परंतु कोटिज्या ही, ऋण राशि मभ$_2$ व धन राशि मय$_2$ यांची निष्पत्ति असल्यामुळे, ऋण आहे. स्पर्शज्या ही, धन राशि भ$_2$य$_2$ व ऋण राशि मभ$_2$ यांची निष्पत्ति असल्यामुळे, ऋण आहे.

तिसऱ्या चरणांत भ$_3$य$_3$ व मभ$_3$ या दोन्ही रेषा ऋण आहेत. म्हणून ज्या आणि कोटिज्या ऋण आहेत, पण स्पर्शज्या धन आहे.

चवथ्या चरणांत भ$_4$य$_4$ ऋण आहे, पण मभ$_4$ धन आहे. म्हणून ज्या ऋण आहे, कोटिज्या धन आहे व स्पर्शज्या ऋण आहे.

ज्याअर्थी व्युत्क्रमज्या ज्येची व्युत्क्रम असते त्याअर्थी कोणत्याहि चरणांत व्युत्क्रमज्येचे चिन्ह ज्येच्या चिन्हाप्रमाणेच असले पाहिजे हे स्पष्ट आहे. तसेच व्युत्क्रमकोटिज्या व कोटिज्या यांची चिन्हे नेहमी समान, आणि कोटिस्पर्शज्या व स्पर्शज्या यांचीहि चिन्हे नेहमी समान असली पाहिजेत.

म्हणून तीन प्रमुख त्रिकोणमितीय निष्पत्तींचीं चिन्हें माहीत असल्यास सर्व त्रिकोणमितीय निष्पत्तींचीं चिन्हें माहीत होतात.

पुढील सारणी लक्षांत ठेवल्यास आपणांस सर्व निष्पत्तींचीं चिन्हें वाढतां येतील.

| | र | |
|---|---|---|
| | ज्या + | ज्या + |
| | कोज्या − | कोज्या + |
| | स्प − | स्प + |
| य′ | म | य |
| | ज्या − | ज्या − |
| | कोज्या − | कोज्या + |
| | स्प + | स्प − |
| | र′ | |

४·२ आता आपण अ चें शून्यापासून २ प्या पर्यंत सतत विचरण होत असतांना, होणारीं ज्या अ चीं विचरणें अनुरेखूं.

मागील अनुच्छेदांतील आकृति पहा

समजा त्र ही वृत्ताची त्रिज्या आहे.

पहिला चरणः— ज्या अ $= \frac{\text{भ}_1\text{व}_1}{\text{त्र}}$ अ शून्यापासून $\frac{\text{प्या}}{२}$ पर्यंत जसजसा वाढतो, तसतशी भ,व, शून्यापासून त्र पर्यंत सतत मोठी होत जाते म्हणून ज्या अ शून्यापासून एक पर्यंत सतत वाढते.

दुसरा चरणः— ज्या अ = $\frac{म_2 य_2}{त्र}$. जेव्हा अ चें $\frac{\pi}{2}$

पासून π पर्यंत विचरण होतें, तेव्हा $म_2 य_2$ त्र पासून शून्या-पर्यंत विचरण होतें, तेव्हा $म_2 य_2$ त्र पासून शून्यापर्यंत लहान होते. म्हणून ज्या अ एक पासून शून्यापर्यंत कमी होते.

तिसरा चरणः— ज्या अ = $\frac{म_3 य_3}{त्र}$. अ चें जसें π

पासून $\frac{3\pi}{2}$ पर्यंत विचरण होतें तशी $म_3 य_3$ शून्यापासून −त्र पर्यंत कमी होते. म्हणून ज्या अ शून्या पासून −१ पर्यंत कमी होते.

चवथा चरणः— ज्या अ = $\frac{म_4 य_4}{त्र}$. अ चें जसें

$\frac{3\pi}{2}$ ते 2π पर्यंत विचरण होतें तशी $म_4 य_4$ त्र ते शून्यापर्यंत वाढते. म्हणून ज्या अ —१ पासून शून्यापर्यंत वाढते.

४५ आवर्तीय त्रितें (periodic functions)

सदिश त्रिज्येचें एक परिभ्रमण पूर्ण झाल्यावर कोणाचें मान २π पासून ४π पर्यंत वाढते, अशा वेळीं ज्या त्याच म्हणजे पूर्वीच्याच विचरण थेर्ढीतून जाते. कोणत्याहि दोन कोणांतील फरक ४ लंबकोण म्हणजेच २π आर इतका

असल्यास दोन्ही कोनांकरिता सदिश त्रिज्येची स्थिति एकच असेल. म्हणून २ प्या इतका फरक असलेल्या कोणत्याहि दोन कोनांची ज्या एकच असेल. यावरून, ज्या हें एक आवर्तीय थिंत आहे व तिचा आवर्तकाल (period) २ प्या आहे हें दिसून येईल. त्याचप्रमाणे सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती आवर्तीय थिंतें आहेत आणि, स्पर्शज्या व कोटिस्पर्शज्या सोडल्यास, सर्वांचा आवर्तकाल २ प्या आहे. स्पर्शज्या व कोटिस्पर्शज्या यांच्या अर्हा (values) परिभ्रमणरेषेच्या प्रत्येक अर्धभ्रमणानंतर पुनरावृत्त होतात हें लवकरच दिसून येईल. म्हणून स्पर्शज्या व कोटिस्पर्शज्या यांचा आवर्तकाल प्या आहे.

४.६ ज्या—बिंदुरेख (sine graph) किंवा र = ज्या य या समीकाराचा बिंदुरेखा.

मय व मर या एकमेकांस लंब असणाऱ्या सरळ रेषा म बिंदुत छेदतात. मय वर य आणि मर वर ज्या य च्या संवादी अर्हा मापा. य च्या योग्य अर्हा उदाहरणार्थ ०, $\frac{\text{प्या}}{२}$,......३ प्या निवडून आणि ज्या य च्या संवादी अर्हा काढून त्या खालील सारणीच्या रूपांत लिहिल्या आहेत.

| य | ० | $\frac{\text{प्या}}{२}$ | प्या | $\frac{३\text{प्या}}{२}$ | २प्या | $\frac{५\text{प्या}}{२}$ | ३प्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ज्या य | ० | १ | ० | −१ | ० | १ | ० |

य करिता $\frac{\text{प्या}}{2}$, आर = २ शतिमान आणि र किंवा ज्या य

करिता १ = १ शतिमान हें प्रमाण घेऊन, य आणि ज्या य ची संवादी अर्हा, अशा युग्मांमुळे मिळणाऱ्या बिंदूंचें अंकन करा. हे सर्व बिंदू एका सतत (continuous) वक्रावर (curve) आहेत हें दिसून येईल. या वक्रास ज्या-बिंदुरेख किंवा




आ. ४.४

र = ज्या य चा बिंदुरेख म्हणतात. हा बिंदुरेख य आणि ज्या य यांच्या योग्य अर्हा घेतल्यास मध ज्या ऋण बाजूसहि काढतां येतो.

४.७ वर दिल्याप्रमाणेच अ चें जेव्हा शून्यापासून २ प्या पर्यंत विचरण होतें तेव्हा कोज्या अ ची होणारी विचरणें काढा व र = कोज्या य हा विदुरेख काढा.




आ. ४.५

हा विदुरेख आकृतींत दाखविल्याप्रमाणे येईल.

४.८ आता आपण अ चें शून्यापासून २ प्या पर्यंत विचरण होत असतांना होणारी स्प अ ची विचरणें देऊं.

पहिला चरणः— यांत स्प अ $= \frac{\text{अ}_1\text{य}_1}{\text{म अ}_1}$

अ शून्य असतो तेव्हा $भ_1य_1$ शून्यासमान आणि $मभ_1 = त्र$ असते.




आ ४ ६

$$\therefore \quad स्प\ अ = \frac{0}{त्र} = 0$$

अ जेव्हा शून्यापासून $\frac{प्या}{२}$ पर्यंत वाढतो, तेव्हा $भ_1य_1$ मध्ये सतत वाढ होते उलट $मभ_1$ कमी होते, म्हणून $\frac{भ_1य_1}{मभ_1}$,

अर्थात् स्प अ, सतत वाढत जाते.

जेव्हा $अ = \frac{प्या}{२}$, तेव्हा $भ_१य_१ = त्र$ व $मभ_१ = ०$

$\therefore$ $स्प अ = \infty$

यावरून पहिल्या चरणांत स्पअ शून्यापासून $\infty$पर्यंत सतत वाढते हें दिसून येईल.

दुसरा चरणः— दुसऱ्या चरणांत अ जेव्हा $\frac{प्या}{२}$ पासून प्या पर्यंत वाढतो, तेव्हा $भ_२य_२$ त्र पासून शून्यापर्यंत कमी होते, उलट $मभ_२$ ऋण राहून संख्येने शून्यापासून त्र पर्यंत वाढते.

$$आता\ स्प अ = \frac{भ_२य_२}{मभ_२}$$

$\therefore$ $अ = \frac{प्या}{२}$ + उपेक्षणीय अल्पसंख्या असते.

तेव्हा $स्प अ = \frac{-त्र}{०} = -\infty$ (जवळजवळ)

आणि, $अ = प्या$ असतो,

तेव्हा $स्प अ = \frac{०}{-त्र} = ०$.

म्हणून स्प अ बैजिक रित्या (algebraically) $-\infty$ पासून शून्यापर्यंत वाढते.

अ $\frac{\text{प्या}}{2}$ ही अर्हा घेण्याच्या किंचित् अगोदर, स्प अ धन असून अतिशय मोठी असते. उलट तो $\frac{\text{प्या}}{2}$ च्या पुढे थोडासा गेल्यावरोबर स्प अ ऋण होऊन संख्येने फार मोठी होते.

यावरून अचें विचरण पहिल्या चरणांतून दुसऱ्या चरणांत होत असतां अ जेव्हा $\frac{\text{प्या}}{2}$ ही अर्हा घेतो तेव्हा स्प अ च्या अर्हांत एकाएकीं खंड पडतो हें दिसून येईल.

तिसरा चरणः— तिसऱ्या चरणांत $\text{म}_3\text{य}_3$ व $\text{मम}_3$ या दोन्ही ऋण असतात आणि $\text{म}_3\text{य}_3$ संख्येने शून्यापासून त्र पर्यंत वाढत जाते, उलट $\text{मम}_3$ संख्येने त्र पासून शून्यापर्यंत कमी होते.

म्हणून $\text{स्प अ} = \frac{\text{म}_3\text{य}_3}{\text{मम}_3}$ धन राहून शून्यापासून अनंतापर्यंत वाढते.

चवथा चरणः— चवथ्या चरणांत $\text{म}_4\text{य}_4$ ऋण असून संख्येने त्र पासून शून्यापर्यंत कमी होते, उलट $\text{मम}_4$ धन असून शून्यापासून त्र पर्यंत वाढते.

म्हणून स्प अ $= \frac{म_१ य_१}{मभ_१}$, बैजिक रित्या $-\infty$ पासून शून्यापर्यंत वाढते.

$\frac{३प्या}{२}$ नून अ जात असतां स्प अ च्या अर्हचें $+\infty$तून $-\infty$ त एकदम विचरण होतें आणि स्प अ च्या अर्हांत आपसी एक खंड पडतो.

४.८१ स्पर्शज्या-बिंदुरेख किंवा र = स्पय चा बिंदुरेख.

| य | ० | $\frac{प्या}{२}-०$ | $\frac{प्या}{२}+०$ | प्या | $\frac{३प्या}{२}-०$ | $\frac{३प्या}{३}+०$ | २प्य |
|---|---|---|---|---|---|---|---|
| स्पय | ० | $\infty$ | $-\infty$ | ० | $\infty$ | $-\infty$ | ० |

वरील सारणींत य च्या शून्यापासून २प्या पर्यंत होणाऱ्या परिवर्तनामुळे स्प य मध्ये होणारी परिवर्तनें दिलीं आहेत. या सारणीवरुन दिसून येईल की य चें प्या ते २प्या पर्यंत विचरण होत असतांना येणाऱ्या स्प य च्या अर्हा त्याचें शून्य ते प्या पर्यंत विचरण होत असतांना येणाऱ्या स्प य च्या अर्हा-समान आहेत. म्हणून स्प य चा आवर्तकाल प्या आहे.

य कोणाच्या महत्ता मय वर निरूपिल्या (represented) आहेत. तसेंच स्प य च्या धन अर्हा मर वर व ऋण अर्हा मर' वर निरूपिल्या आहेत. या अर्हांच्या साह्यानें बिंदूंचें अंकन करून र = स्पय चा बिंदुरेख आकृतींत दाखविल्याप्रमाणे काढतां येतो हा यक्र य च्या २प्या हून अधिक अर्हांकरिता

तसेंच य च्या ऋण अर्हांकरितांहि वाढवितां येतो.




आ ४.७

### ४.९ व्युत्क्रमज्या बिंदुरेख.

आकृतींत य च्या शून्यापासून २प्या पर्यंतच्या अर्हा घेऊन येणारा र – व्युज्ज्या य चा बिंदुरेख दाखविला आहे.




आ. ४.८

## उदाहरणें

अ शून्यापासून २ प्या पर्यंत विचरतांना होणारी व्युत्कोज्या अ व कोस्प अ चीं विचरणें रेखा व

(१) र = व्युत्कोज्या य आणि

(२) र = कोस्प य यांचे बिंदुरेख काढा.

यावरून अशा दोन कोनांच्या सर्व त्रिकोणमितीय निष्पत्ती महत्तेत तसेंच चिन्हांतहि एकच असल्या पाहिजेत.

म्हणून ३६०°. स + अ आणि अ यांच्या निष्पत्ती एकच असतात.




आ. ५.२

तसेंच, ३६०°. स − अ या कोणाच्या निष्पत्ती व − अ च्या निष्पत्ती एकच असल्या पाहिजेत.

उपसाध्य:— ३६०° च्या व ०°च्या निष्पत्ती एकच असतात.

५.२ अ चें मान कोणतेंहि असतांना, − अ कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती अ च्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

समजा परिभ्रमणरेषा मय पासून निघून धन दिशेनें अ इतका यमय हा कोन रेखिते, तसेंच ऋण दिशेनें यमय' हा अ इतकाच कोन रेखितें.

∴ ∠यमय' = − अ

मय वील य या कोणत्याहि बिंदूतून मय (वा मय') ला यभ हा लम्ब काढा, व तो वाढवून मय' ला य' मधे छेदूं द्या.






आ. ५.३

मव च्या चार चरणांतील स्थितीनुसार चार प्रकारच्या आकृत्या काढल्या आहेत.

घमम व व'मम या लंबकोण त्रिकोणांत, मभ रेषा साधारण आहे; व ∠ममव = ∠भमव'

म्हणून हे दोन त्रिकोण सर्वांगसम (congruent) आहेत.

म्हणून वरील चार पैकी प्रत्येक आकृतींत रेषांचीं चिन्हें विचारांत घेतल्यास,

$$\text{मव}' = \text{मव}$$

$$\text{आणि } \text{भव}' = -\text{भव}$$

म्हणून, परिभाषेवरून,

$$\text{ज्या}(-\text{अ}) = \frac{\text{भव}'}{\text{मव}'} = \frac{-\text{भव}}{\text{मव}} = -\text{ज्या अ}$$

$$\text{व कोज्या } (-\text{अ}) = \frac{\text{मभ}}{\text{मव}'} = \frac{\text{मभ}}{\text{मव}} = \text{कोज्या अ}$$

$$\text{स्प } (-\text{अ}) = \frac{\text{ज्या } (-\text{अ})}{\text{कोज्या } (-\text{अ})} = \frac{-\text{ज्या अ}}{\text{कोज्या अ}} = -\text{स्प अ}$$

$$\text{आणि व्युज्ज्या } (-\text{अ}) = -\text{व्युज्ज्या अ}$$

$$\text{व्युत्कोज्या } (-\text{अ}) = \text{व्युत्कोज्या अ}$$

$$\text{कोस्प } (-\text{अ}) = -\text{कोस्प अ}$$

उदाहरण— $\text{ज्या } (-\text{४५}) = -\text{ज्या ४५}^\circ = -\frac{\text{१}}{\sqrt{\text{२}}}$

$$\text{स्प } (\text{३६०}^\circ - \text{३०}^\circ) = \text{स्प } (-\text{३०}^\circ) = -\text{स्प ३०}^\circ = -\frac{\text{१}}{\sqrt{\text{३}}}$$

$$\text{कोज्या } (-\text{६०}^\circ) = \text{कोज्या ६०}^\circ = \frac{\text{१}}{\text{२}}$$

५·३ श्रिताची परिभाषा.

कोणतीहि पदसंहति (expression) चल (variable) राशि आणि अचल (constant) राशि यांची बनलेली असते. चलराशीच्या निरनिराळ्या अर्हांनुसार पदसंहतीची अर्हाहि बदलत जाते. एखाद्या पदसंहतींत य ही चल राशि असल्यास त्या पदसंहतीला य चें श्रित (function) म्हणतात.

य चें श्रित श्रि(य) असें लिहितात. श्रि(य) या य च्या श्रितांत य ऐवजी –य लिहून त्याची महत्ता व चिन्ह बदलत नसल्यास त्याला य चें सम (even) श्रित म्हणतात

श्रि(य) समश्रित असल्यास,

श्रि(–य) = श्रि(य)

य च्या जागीं –य लिहून श्रि(य) चें चिन्ह बदलत असेल पण त्याची महत्ता पूर्वीइतकीच रहात असेल तर त्याला य चें विषम (odd) श्रित म्हणतात.

श्रि(य) विषम श्रित असल्यास,

श्रि (–य) = – श्रि (य)

मागील अनुच्छेदावरून असें दिसून येईल की कोज्या य व व्युत्कोज्या य हीं य चीं सम श्रितें असून ज्या य, व्युज्ज्या य, स्प य, कोस्प य य चीं विषम श्रितें आहेत

५·४ अ चें मान कोणतेंहि असतांना, ९०° – अ अथवा $\frac{\text{प्या}}{२}$ – अ कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती अ च्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

मर ही एक परिभ्रमणरेषा यमव हा अ समान कोण रेखिते. मर' ही दुसरी परिभ्रमणरेषा मय पासून निघून यमर

हा ९०° चा कोण रेखिते व नंतर रमव' = अ हा कोण घटीवत् दिशेने रेखिते.

$\therefore$ ∠यमव' = ९०° − अ

मव आणि मव' या रेषांवर म पासून समान अंतरावर अनुक्रमें व आणि व' हे बिंदू घ्या आणि मय (वा मय') ला वभ आणि व'भ' हे लंब काढा.













आ. ५.४

आता, $\angle$यमव व $\angle$रमय' यांची महत्ता समान आहे.

म्हणून $\angle$भमव = $\angle$मर'भ'

शिवाय मर = मर'

म्हणून वमभ व मय'म' हे दोन लंबकोण त्रिकोण सर्वांगसम आहेत. म्हणून या दोन त्रिकोणांतील संवादी बाजू समान महत्तेच्या असल्या पाहिजेत.

म्हणून, सर्व आकृत्यांत, चिन्हें विचारांत घेऊन,

भ'व' = मभ,

मम' = भव,

मर' = मर

म्हणून, परिभाषेनुसार,

$$ज्या(९०^\circ - अ) = ज्या\angle यमर' = \frac{भ'व'}{मव'} = \frac{मभ}{मव} = कोज्या\ अ$$

$$कोज्या\ (९०^\circ - अ) = कोज्या\angle यमर' = \frac{मम'}{मव'} = \frac{मर}{मर} = ज्या\ अ$$

$$\therefore स्प(९०^\circ - अ) = \frac{ज्या(९०^\circ - अ)}{कोज्या\ (९०^\circ - अ)} = \frac{कोज्या\ अ}{ज्या\ अ} = कोस्प\ अ$$

आणि व्युज्ज्या $(९०^\circ - अ)$ = व्युत्कोज्या अ,

व्युत्कोज्या $(९०^\circ - अ)$ = व्युज्ज्या अ,

कोस्प $(९०^\circ - अ)$ = स्प अ

५.५ अ चें मान कोणतेंहि असतांना, $९०^\circ + अ$ अथवा $\frac{प्या}{२} + अ$ कोणाच्या निष्पत्ती अ च्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

मय ही परिभ्रमणरेषा मय पासून निघून यमव हा अ समान घन कोण रेखिते. नंतर ती त्याच दिशेने एका लंब कोणाइतके भ्रमण करून मव' या स्थितीत येते.













आ. ५. ५.

$\therefore \angle$ यमव' $= ९०^{\circ} +$ अ

मव आणि मव' या रेषांवर म पासून समान अंतरावर

य आणि य' बिंदू घ्या व मय (वा मय') ला यभ आणि य'भ' हे लंब काढा.

आता मभय व मभ'य' त्रिकोण सर्वांगसम आहेत, व म्हणून त्यांच्या संवादी बाजू समान आहेत.

म्हणून, योग्य चिन्हें घेऊन, चारहि आकृत्यांत,

$$\text{मय}' = \text{मय},$$

$$\text{भ}'\text{य}' = \text{मभ},$$

$$\text{व मभ}' = -\text{भय}$$

$$\therefore \text{ज्या } (९०^\circ + \text{अ}) = \frac{\text{भ}'\text{य}'}{\text{मय}'} = \frac{\text{मभ}}{\text{मय}} = \text{कोज्या अ}$$

$$\text{कोज्या } (९०^\circ + \text{अ}) = \frac{\text{मभ}'}{\text{मय}'} = \frac{-\text{भय}}{\text{मय}} = -\text{ ज्या अ}$$

$$\therefore \text{ स्प } (९०^\circ + \text{अ}) = \frac{\text{ज्या}(९०^\circ + \text{अ})}{\text{कोज्या}(९०^\circ + \text{अ})} = \frac{\text{कोज्या अ}}{-\text{ज्या अ}}$$

$$= -\text{कोस्प अ}$$

$$\text{आणि व्युज्ज्या } (९०^\circ + \text{अ}) = \text{व्युत्कोज्या अ},$$

$$\text{व्युत्कोज्या } (९०^\circ + \text{अ}) = -\text{व्युज्ज्या अ},$$

$$\text{कोस्प } (९०^\circ + \text{अ}) = -\text{ स्प अ}$$

उदाहरण— १२०° च्या निष्पत्ती काढा.

$$\text{ज्या } (१२०^\circ) = \text{ज्या}(९०^\circ + ३०^\circ) = \text{कोज्या}३०^\circ = \frac{\sqrt{३}}{२}$$

कोज्या $(१२०^\circ)$ = कोज्या$(९०^\circ + ३०^\circ)$ = $-$ ज्या$३०^\circ$

$$= -\frac{१}{२}$$

स्प $(१२०^\circ)$ = स्प$(९०^\circ + ३०^\circ)$ = $-$ कोस्प$३०^\circ$ = $-\sqrt{३}$

$१२०^\circ$ च्या बाकीच्या निष्पत्ती आता लिहितां येतील

५·६ अ चें कोणतेंहि मान असतांना, $१८०^\circ -$ अ अथवा ध्या $-$ अ कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती अ च्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

५·४ व ५·५ या अनुच्छेदांच्या साह्यानें आपण $१८०^\circ -$ अ च्या निष्पत्ती काढूं शकतों.

ज्या $(१८०^\circ -$ अ$)$ = ज्या $(९०^\circ + \overline{९०^\circ - \text{अ}})$

= कोज्या $(९०^\circ -$ अ$)$

(अनु. ५·१ वरुन)

= ज्या अ

(अनु ५·४ वरुन)

कोज्या $(१८०^\circ -$ अ$)$ = कोज्या $(९०^\circ + \overline{९०^\circ - \text{अ}})$

= $-$ ज्या $(९०^\circ -$ अ$)$

(अनु ५·१ वरुन)

= $-$ कोज्या अ

(अनु. ५·३ वरून)

तसेंच, $स्प (१८०^\circ - अ) = स्प (९०^\circ + \overline{९०^\circ - अ})$

$= - कोस्प (९०^\circ - अ)$

$= - स्प अ$

आणि, व्युज्ज्या $(१८०^\circ - अ) =$ व्युज्ज्या अ,

व्युत्कोज्या $(१८०^\circ - अ) = -$ व्युत्कोज्या अ,

कोस्प $(१८०^\circ - अ) = -$ कोस्प अ

अभ्यासः— वरील संबंध आकृति काढून रैखिर्गाने सिद्ध करा.

उदाहरण १— १८०° च्या निष्पत्ती काढा.

ज्या $(१८०^\circ) =$ ज्या $(१८०^\circ - ०^\circ) =$ ज्या $०^\circ = ०$

कोज्या $(१८०^\circ) =$ कोज्या $(१८०^\circ - ०^\circ) = -$ कोज्या $०^\circ = -१$

स्प $(१८० ) =$ स्प $(१८० - ०^\circ) = -$ स्प $० = ०$, वगैरे.

उदाहरण २— १३५ च्या निष्पत्ती काढा.

$$ज्या (१३५^\circ) = ज्या (१८०^\circ - ४५^\circ) = ज्या ४५^\circ = \frac{१}{\sqrt{२}}$$

$$कोज्या (१३५^\circ) = कोज्या (१८०^\circ - ४५^\circ)$$

$$= - कोज्या ४५ = - \frac{१}{\sqrt{२}}$$

$$स्प (१३५^\circ) = स्प (१८०^\circ - ४५^\circ) = - स्प ४५^\circ = -१$$

उदाहरण ३— १५०° च्या निष्पत्ती काढा.

$$ज्या (१५०^\circ) = ज्या (१८०^\circ - ३०^\circ) = ज्या ३० = \frac{१}{२}$$

$$\text{कोज्या }(१५०^\circ) = \text{कोज्या }(१८०^\circ - ३०^\circ)$$

$$= -\text{कोज्या } ३०^\circ = -\frac{३}{\sqrt{२}}$$

$$\text{स्प }(१५०^\circ) = \text{स्प }(१८०^\circ - ३०^\circ) = -\text{स्प } ३०^\circ = -\frac{१}{\sqrt{३}}$$

टीप— १२०,° १३५,° १५०° च्या निष्पत्ती ५.५ अनुच्छेदानेहि काढतां येतात.

५.७ अ चें कोणतेंहि मान असतांना, १८०° + अ अथवा प्या + अ कोणाच्या निष्पत्ती अ च्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

या निष्पत्ती ५.५ अनुच्छेदाचा उत्तरोत्तर उपयोग करून काढतां येतात.

$$\text{ज्या }(१८०^\circ + \text{अ}) = \text{ज्या }(९०^\circ + \overline{९०^\circ + \text{अ}})$$

$$= \text{कोज्या }(९०^\circ + \text{अ}) = -\text{ज्या अ}$$

$$\text{कोज्या }(१८०^\circ + \text{अ}) = \text{कोज्या }(९०^\circ + \overline{९०^\circ + \text{अ}})$$

$$= -\text{ज्या }(९०^\circ + \text{अ}) = -\text{कोज्या अ}$$

$$\text{स्प }(१८०^\circ + \text{अ}) = \text{स्प }(९०^\circ + \overline{९०^\circ + \text{अ}})$$

$$= -\text{कोस्प }(९०^\circ + \text{अ}) = \text{स्प अ}$$

आणि व्युज्ज्या (१८०° + अ) = − व्युज्ज्या अ

व्युत्कोज्या (१८०° + अ) = − व्युत्कोज्या अ

कोस्प (१८०° + अ) = कोस्प अ

अभ्यासः— १८०° + अ च्या निष्पत्ती आकृति काढून रेखिकीने काढा.

५.८ उदाहरण— २७०°−अ व २७०° + अ या कोणांच्या निष्पत्ती काढा.

या कोणांच्या तीन प्रमुख निष्पत्ती काढल्यास त्यावरून बाकीच्या निष्पत्ती सहज लिहितां येतील.

ज्या (२७०° − अ) = ज्या (१८०° + ९०° − अ)
= − ज्या (९०° − अ) = − कोज्या अ

कोज्या (२७०° − अ) = कोज्या (१८०° + ९०° − अ)
= − कोज्या (९०° − अ) = − ज्या अ

स्प (२७०° − अ) = स्प (१८०° + ९०° − अ)
= स्प (९०° − अ) = कोस्प अ

ज्या (२७०° + अ) = ज्या (१८०° + ९०° − अ)
= − ज्या (९०° + अ) = − कोज्या अ

कोज्या (२७०° + अ) = कोज्या (१८०° + ९०° + अ)
= − कोज्या (९०° + अ) = ज्या अ

स्प (२७०° + अ) = स्प (१८०° + ९०° + अ)
= स्प (९०° + अ) = − कोस्प अ

अन्यथा:—

ज्या (२७०° – अ) = ज्या (३६०° – ९०° – अ)

= ज्या (– ९०° – अ) = – ज्या (९०° + अ) = – कोज्या अ

इत्यादि.

कोज्या (२७०° + अ) = कोज्या (३६०° – ९०° + अ)

= कोज्या (– ९०° + अ)

= कोज्या (९०° – अ)

= ज्या अ इत्यादि.

५.९ आता आपण नमुन्यादाखल कांही उदाहरणें सोडवूं.

उदाहरण १— ज्या (१५६०°) व कोस्प (–४०५°) काढा.

ज्या (१५६०°) = ज्या (४ × ३६०° + १२०°) = ज्या १२०°

= ज्या (१८०° – ६०°) = ज्या ६०° = $\frac{\sqrt{३}}{२}$

कोस्प (– ४०५°) = – कोस्प (४०५°)

= – कोस्प (३६०° + ४५°)

= – कोस्प ४५° = – १

उदाहरण २—

$$\frac{[\text{स्प } ४५^\circ + \text{स्प } (\text{प्या} + \text{अ})]\ [\text{कोस्प } ४०५^\circ + \text{कोस्प}(\frac{\text{प्या}}{२} + \text{अ})]}{[\text{कोज्या अ} + \text{ज्या}(\text{प्या} - \text{अ})]\ [\text{ज्या}(\frac{\text{प्या}}{२} + \text{अ}) + \text{ज्या}(\text{प्या} + \text{अ})]}$$

यांस सरळ रूप द्या ( simplify ) आणि $अ = \frac{\text{π}}{६}$

असल्यास त्याचें मान $\frac{४}{३}$ होतें हें दाखवा.

दिलेली पदसंहति

$$= \frac{(१ + \text{स्प अ})\left[\text{कोस्प}(३६०^\circ + ४५^\circ) - \text{स्पअ}\right]}{(\text{कोज्या अ} + \text{ज्या अ})(\text{कोज्या अ} - \text{ज्या अ})}$$

$$= \frac{(१ + \text{स्प अ})(१ - \text{स्प अ})}{\text{कोज्या}^२\text{अ} - \text{ज्या}^२\text{अ}}$$

$$= \frac{१ - \text{स्प}^२\text{अ}}{\text{कोज्या}^२\text{अ} - \text{ज्या}^२\text{अ}}$$

$$= \frac{१ - \frac{\text{ज्या}^२\text{अ}}{\text{कोज्या}^२\text{अ}}}{\text{कोज्या}^२\text{अ} - \text{ज्या}^२\text{अ}}$$

$$= \frac{\text{कोज्या}^२\text{अ} - \text{ज्या}^२\text{अ}}{\text{कोज्या}^२\text{अ}} \times \frac{१}{\text{कोज्या}^२\text{अ} - \text{ज्या}^२\text{अ}}$$

$$= \frac{१}{\text{कोज्या}^२\text{अ}} = \text{व्युत्कोज्या}^२\text{अ}$$

आता $अ = \frac{\text{π}}{६}$ असल्यास,

ही पदसंहति = व्युत्कोज्या$^2$ $\frac{\text{प्या}}{६}$ = $\frac{१}{\text{कोज्या}^2 \frac{\text{प्या}}{६}}$

$$= \frac{१}{(\sqrt{\frac{३}{२}})^२} = \frac{४}{३}$$

उदाहरण ३— सिद्ध कराः—

$$\left[\text{ज्या}^2 \left(\frac{\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{३\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{५\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{७\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{९\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{११\text{प्या}}{१२}\right)\right] = ३$$

आता $\text{ज्या}\left(\frac{११\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\text{प्या} - \frac{\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\frac{\text{प्या}}{१२}\right)$

$\text{ज्या}\left(\frac{९\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\text{प्या} - \frac{३\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\frac{३\text{प्या}}{१२}\right)$

$\text{ज्या}\left(\frac{७\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\text{प्या} - \frac{५\text{प्या}}{१२}\right) = \text{ज्या}\left(\frac{५\text{प्या}}{१२}\right)$

म्हणून वामपक्ष $= २\left[\text{ज्या}^2 \left(\frac{\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{३\text{प्या}}{१२}\right) + \text{ज्या}^2 \left(\frac{५\text{प्या}}{१२}\right)\right]$

पण $ज्या\left(\frac{५π}{१२}\right)=ज्या\left(\frac{π}{२}-\frac{π}{१२}\right)$

$$=कोज्या\left(\frac{π}{१२}\right)$$

$$\therefore\ वामपक्ष=२\left[\left\{ज्या^२\left(\frac{π}{१२}\right)+कोज्या^२\left(\frac{π}{१२}\right)\right\}+ज्या^२\left(\frac{३π}{१२}\right)\right]$$

$$=२\left[१+ज्या^२\left(\frac{π}{४}\right)\right]$$

$$=२\left[१+\left(\frac{१}{\sqrt{२}}\right)^२\right]$$

$$=२\times\frac{३}{२}$$

$$=३$$

उदाहरण ४— स कोणताहि पूर्णांक (integer) असल्यास, $कोज्या\ (स\ π+अ)=(-१)^स\ कोज्या\ अ$ हें सिद्ध करा.

समजा घ कोणताहि पूर्णांक असून स =२घ समान म्हणजेच एक सम पूर्णांक आहे.

$$\therefore\ कोज्या\ (स\ π+अ)=कोज्या\ (२\ घ\ π+अ)$$

$= \text{कोज्या } (३६०^\circ \cdot घ + अ)$

$= \text{कोज्या } अ$

$= (-१)^{२घ} \text{ कोज्या } अ$

$= (-१)^{स} \text{ कोज्या } अ$

आता, स विषम पूर्णांक असून २घ+१ समान आहे असें समजा.

$\therefore \text{कोज्या } (स\, प्या + अ) = \text{कोज्या}(\overline{२घ + १}प्या + अ)$

$= \text{कोज्या } (२घ\, प्या + \overline{प्या + अ})$

$= \text{कोज्या } (प्या + अ)$

$= -\text{कोज्या } अ$

$= (-१)^{२घ+१} \text{ कोज्या } अ$

$= (-१)^{स} \text{ कोज्या } अ$

म्हणून, स कोणताहि पूर्णांक असतांना,

$\text{कोज्या } (स\, प्या + अ) = (-१)^{स} \text{ कोज्या } अ$

## उदाहरणसंग्रह ६

(१) खालील समीकारांचे समाधान करणाऱ्या (satisfy) $०^\circ$ व $३६०^\circ$ मधील अ च्या अर्हा काढा.

(क) $\text{ज्या } अ = \frac{१}{२}$; (का) $\text{व्युत्कोज्या } अ = \sqrt{२}$;

(कि) $\text{स्प } अ = -\frac{१}{\sqrt{३}}$

(२) जर क, ख, ग, घ हे एका वृत्तीय (cyclic) चतुर्भुजाचे (quadrilateral) कोण असतील तर कोज्या क + कोज्या ख + कोज्या ग + कोज्या घ = ० हें सिद्ध करा. (कलकत्ता १८६५)

(३) सरळ रूप द्या :—

$$\frac{\text{ज्या } (९०^\circ - \text{अ}) \text{ कोज्या } (-\text{अ}) \text{ स्प } (१८०^\circ + \text{अ})}{[१ + \text{ज्या}(१८०^\circ - \text{अ})][१ - \text{ज्या}(३६०^\circ + \text{अ})]\text{कोस्प}(९०^\circ - \text{अ})}$$

सिद्ध कराः—

(४) ज्या (४८०°) कोज्या (३३०°) + कोज्या (−२४०°) ज्या (−३३०°) $= \frac{१}{२}$

(५) स्प (२४०°) कोज्या (३९०°) + ज्या (८४०°) कोस्प (−३०°) = ०

(६) कोज्या (६००°) कोज्या (५७०°) = ज्या (२४०°) ज्या (६९०°) $= \frac{\sqrt{३}}{४}$

(७) $\text{स्प}\left(\frac{३\text{ प्या}}{२} - \text{अ}\right)$ व्युत्कोज्या (−अ) $\text{ज्या}\left(\frac{\text{प्या}}{२} + \text{अ}\right)$

= कोस्प (प्या − अ) $\text{व्युज्ज्या}\left(\frac{\text{प्या}}{२} - \text{अ}\right)$

× कोज्या (प्या + अ)

(८) $\text{कोज्या}^{५} \frac{\text{प्या}}{२०} + \text{कोज्या}^{५} \frac{३\text{प्या}}{२०} + \text{कोज्या}^{५} \frac{५\text{प्या}}{२०} + \ldots$

$$\ldots + \text{कोज्या}^{५} \frac{१९\text{प्या}}{२०} = ०$$

(९) $\text{स्प}(\text{प्या} + \text{अ}) + \text{स्प}(२\text{प्या} - \text{अ}) + \text{स्प}(३\text{प्या} + \text{अ})$
$+ \text{स्प}(४\text{प्या} - \text{अ}) \ldots\ldots + \text{स्प}\,[(२\text{स} - १)\,\text{प्या} + \text{अ}]$
$+ \text{स्प}(२\text{स}\,\text{प्या} - \text{अ}) = ०$

(१०) स विषम वा सम असेल तदनुसार $\text{ज्या अ} + \text{ज्या}(\text{प्या} + \text{अ}) + \text{ज्या}(२\text{प्या} + \text{अ}) + \ldots\ldots$ स पदांपर्यंत
$= \text{ज्या अ}$
अथवा $= ०$
हें सिद्ध करा.

(११) पुढीलपैकी प्रत्येक पदसंहतीची अर्हा आठ आहे हें दाखवा.

(१) $\text{व्युत्कोज्या}^{२} \left(\frac{\text{प्या}}{४}\right) + \text{व्युत्कोज्या}^{२} \left(\frac{३\text{प्या}}{४}\right)$

$+ \text{व्युत्कोज्या}^{२} \left(\frac{५\text{प्या}}{४}\right) + \text{व्युत्कोज्या}^{२} \left(\frac{७\text{प्या}}{४}\right)$

(२) $\text{व्युज्ज्या} \left(\frac{\text{प्या}}{४}\right) \text{व्युज्ज्या}^{२} \left(\frac{३\text{प्या}}{४}\right) \times$

$\text{व्युज्ज्या} \left(\frac{५\text{प्या}}{४}\right) \text{व्युज्ज्या}^{२} \left(\frac{७\text{प्या}}{४}\right)$

(३) $\Big[ \text{व्युत्कोज्या}\,\frac{\text{प्या}}{४} \left( \text{कोज्या}\,\frac{\text{प्या}}{४} + \text{ज्या}\,\frac{\text{प्या}}{४} \right)$

$+ \text{व्युत्कोज्या}\,\frac{३\text{प्या}}{४} \left( \text{कोज्या}\,\frac{३\text{प्या}}{४} - \text{ज्या}\,\frac{३\text{प्या}}{४} \right)$

$+ \text{व्युत्कोज्या}\,\frac{५\text{प्या}}{४} \left( \text{कोज्या}\,\frac{५\text{प्या}}{४} + \text{ज्या}\,\frac{५\text{प्या}}{४} \right)$

$+ \text{व्युत्कोज्या}\,\frac{७\text{प्या}}{४} \left( \text{कोज्या}\,\frac{७\text{प्या}}{४} - \text{ज्या}\,\frac{७\text{प्या}}{४} \right) \Big]$

(१२) स एक धन पूर्णांक असल्यास, आणि

$\text{इ} = \frac{\text{प्या}}{२} - (२\,\text{स} - १)\,\text{इ}$ असल्यास सिद्ध करा की,

$\text{स्पइ स्प३इ स्प५इ} \ldots\ldots \text{स्प}\,(२\,\text{स} - १)\,\text{इ} = १$

# प्रकरण सहावें

## दिलेली त्रिकोणमितीय निष्पत्ति असलेल्या सर्व कोणांच्या सामान्य पदसंहती

६.१ त्रिकोणमितीय निष्पत्तींचें दिलेलें मान असणाऱ्या कोणांची संख्या अनन्त असते हें मागील प्रकरणावरून स्पष्टपणें दिसून येईल. उदाहरणार्थ, ज्या अ $=\frac{१}{२}$ दिली असल्यास, अ ३०° किंवा त्याचा ऋजुपूरक (supplementary कोण १५०° असूं शकतो. याशिवाय हे दोन कोण ३६०° नी किंवा ३६०° च्या अपवर्त्यांनी वाढवून अथवा कमी करून येणाऱ्या कोणांपर्यंतहि अ चें मान असूं शकतें. म्हणून ३०°, १५०°, ३९०°, ५१०°,... −३३०°, −२१०°....इत्यादि कोणांची ज्या $\frac{१}{२}$ आहे.

इतर निष्पत्तींनाहि वरील विधान लागूं पडेल.

निरनिराळ्या निष्पत्तींच्या मानांच्या ज्या अनंत श्रेढी (infinite series) येतात त्यांना समाविष्ट करणाऱ्या कांही सामान्य (general) पदसंहती मिळतात काय हें आपण आता पाहूं.

६·२ समजा परिभ्रमणरेषा मय या आदिम स्थितींत आहे या स्थितींत येतांना तिचो घन वा ऋण दिशेनें ०,

य′ म य

आ : १

किंवा १, किंवा २, किंवा ३, .. इत्यादि पूर्ण परिभ्रमणें झालीं असलीं पाहिजेत. तिनें मुळींच भ्रमण केलें नसेल तर तिनें रेखिलेला कोण शून्य असतो. तिनें घन दिशेनें एक परिभ्रमण पूर्ण केलें असल्यास रेखिलेला कोण २ प्या होतो. तेंच भ्रमण ऋण दिशेनें झालें असल्यास रेखिलेला कोण −२ प्या होतो. तिनें दोन परिभ्रमणें पूर्ण केलीं असल्यास प्रतिघटीवत् वा घटीवत् भ्रमण असेल त्याप्रमाणे रेखिलेला कोण ४ प्या किंवा −४ प्या इतका होतो. म्हणून परिभ्रमणरेषा मय या स्थितींत असते तेव्हां तिनें रेखिलेला कोण ०, किंवा ± २ प्या, किंवा ± ४ प्या, किंवा ± ६ प्या,.. असतो. स, शून्य किंवा कोणताहि घन वा ऋण पूर्णांक असल्यास हे सर्व कोण २सप्या या एकाच व्यंजकानें (expression) दर्शविता येतात.

मय′ या स्थितींत येण्याकरितां परिभ्रमण रेषेला प्रथम कांहीं पूर्ण परिभ्रमणें करून मय या स्थितींत यावें लागतें, आणि नंतर घन वा ऋण दिशेनें अर्धपरिभ्रमण करावें लागतें म्हणून परिभ्रमणरेषा जेव्हां मय′शीं संपाती होते तेव्हां तिनें रेखिलेला कोण २सप्या + प्या किंवा २सप्या − प्या म्हणजेच (२स ± १) प्या इतका असतो.

६·३ दिलेली ज्या असणारा अल्पिष्ट (least) धन कोण रचणें व एकच ज्या असणारे सर्व कोन समाविष्ट करणारी सामान्य पद्संहति काढणें.



आ. ६ १

समजा एखाद्या कोनाची ज्या 'क्ष' समान दिली आहे. यय व रर' या म बिंदूत छेदणाऱ्या आणि एकमेकांना लंब असणाऱ्या रेषा घ्या. म केन्द्र घेऊन १ ही त्रिज्या असलेलें वृत्त काढा. मर वर (किंवा क्ष ऋण असल्यास मर' वर) मप=क्ष मापा. प मधून य'पय ही सरळ रेषा य'मय ला समान्तर काढून वृत्तास य आणि य' या बिंदूंत छेदूं द्या.

कोन यमय इ ने दर्शवा.

आता, ज्या इ = ज्या मवप $= \frac{मप}{मव} = \frac{क्ष}{१} =$ क्ष.

∴ इ हा दिलेली ज्या असणारा आलिष्ठ कोण आहे.

क्ष ही ज्या असलेला ∠ यमव' = प्या − इ हा आणखीहि एक कोण आहे हें आकृतीवरून स्पष्टपणें दिसून येईल.

'क्ष'ची महत्ता व चिन्ह दिलें असल्यामुळे प चें र' मर वरील स्थान स्थिर आहे. म्हणून परिभ्रमणरेषा शून्यापासून २ प्या पर्यंत जात असतां दिलेलीज्या असणारे, इ व प्या − इ, हे दोनच कोण ती रेखाटते हें आकृतीवरून सहज दिसून येईल.

म्हणजे, परिभ्रमणरेषा जेव्हां मव वा मव' यांपैकी कोणत्यातरी एका स्थितींत असते, व दुसऱ्या कोणत्याहि स्थितींत नसते, तेव्हांच तिने रेखिलेल्या कोणाची ज्या दिलेल्या मानाइतकी (म्हणजे क्ष इतकी) असते (७६ अनुच्छेदहि पहा)

आता परिभ्रमणरेषेची स्थिति मव असते तेव्हां तिने कोणत्याहि पूर्ण संख्येइतकी परिभ्रमणें पूर्ण करून नंतर इ हा कोण रेखिलेला असतो. म्हणजे, मागील अनुच्छेदानुसार, घ शून्य किंवा धन या ऋण पूर्णांक असल्यास, तिने रेखिलेला कोण

२ घ प्या + इ.......... ........(१)

इतका असतो.

तसेंच परिभ्रमणरेषा मव' या स्थितींत असते तेव्हां तिने रेखिलेला कोण, (घ शून्य किंवा कोणताहि धन या ऋण पूर्णांक असल्यास),

२ध ध्या + (ध्या − इ) म्हणजेच (२ध + १)ध्या − इ...(२) इतका असतो.

आता स शून्य किंवा कोणताहि धन वा ऋण पूर्णांक असल्यास, वरील कोणांचे दोन्ही संच,

स ध्या + $(-१)^{स}$ इ .................... (३)

या पदसंहतींत समाविष्ट होतात.

कारण, $(-१)^{२ध} = +१$, म्हणून स २ध समान असतो तेव्हां (३) चें रुपांतर २धध्या + इ अर्थात् पदसंहति (१) मधे होते.

आणि $(-१)^{२ध+१} = -१$, म्हणून स २ध + १ समान असतो तेव्हां (३) चें रुपांतर (२ध + १) ध्या − इ अर्थात् पदसंहति (२) मधे होते.

उपसाध्यः— एकच ज्या असणाऱ्या सर्व कोणांची व्युत्क्रमज्याहि एकच असते, म्हणून पदसंहति (३) मधे इ च्या व्युत्क्रमज्येइतकी व्युत्क्रमज्या असणार सर्व कोण समाविष्ट होतात.

६·४ दिलेली कोटिज्या असणारा अल्पिष्ठ धन कोण रचणें व एकच कोटिज्या असणाऱ्या सर्व कोणांकरितां सामान्य पदसंहति काढणें.




आ ६.३

समजा दिलेली कोटिज्या 'क्ष' आहे.

म मधे छेदणाऱ्या य'मय आणि र'मर या दोन लंब रेषा घ्या.

मय वर (किंवा 'क्ष' ऋण असल्यास मय' वर) मप = क्ष मापा. प तून य'पय, र'मर ला समांतर काढा आणि तिला, म हे केन्द्र व १ ही त्रिज्या असलेल्या वृत्तास, य आणि य' मधे छेदू द्या.

कोण यमय ई ने दर्शवा.

पहिल्या चरणांत इ आणि −इ हेच कोण केवळ असे आहेत की ज्यांची कोटिज्या दिलेल्या कोटिज्येइतकी (म्हणजे 'क्ष') आहे हें आकृतीवरून दिसून येईल.

म्हणून, परिभ्रमणरेषा मव वा मव' या स्थितींत असते व दुसऱ्या कोणत्याहि स्थितींत नसते, तेव्हांच तिने रेखिलेल्या कोणाची कोटिज्या दिलेल्या कोटिज्येइतकी असते.

(५.२ अनुच्छेदहि पहा.)

परिभ्रमणरेषा मव या स्थितींत असते तेव्हां तिने कोणत्याहि पूर्ण संख्येइतकी परिभ्रमणें पूर्ण करून नंतर इ हा कोण रेखिलेला असतो; म्हणजे, स शून्य किंवा कोणताहि धन वा ऋण पूर्णांक असल्यास, तिने रेखिलेला कोण

२स प्या + इ

इतका असतो.

परिभ्रमणरेषा मव' या स्थितींत असते तेव्हां तिने कोणत्याहि पूर्ण संख्येइतकी परिभ्रमणें पूर्ण करून नंतर −इ कोण रेखिलेला असतो, म्हणजे तिने

२सप्या − इ

हा कोण रेखिलेला असतो.

स शून्य किंवा कोणताहि धन वा ऋण पूर्णांक असेल तर हे सर्व कोण

२सप्या ± इ..................(१)

या पदसंहतींत समाविष्ट होतात.

उपसाध्यः— ज्या कोणांची व्युत्क्रमकोटिज्या इ च्या व्युत्क्रमकोटिज्येइतकी आहे असे सर्व कोण पदसंहति (१) मध्ये समाविष्ट होतात.

६.५ दिलेली स्पर्शज्या असणारा लघिष्ठ धन कोण रचणें व एकच स्पर्शज्या असणाऱ्या सर्व कोणांकरिता सामान्य पदसंहति काढणें.




आ. ९.४

समजा 'क्ष' हें दिलेल्या स्पर्शरेषेचें मान आहे. य'मय आणि र'मर या म मध्ये छेदणाऱ्या आणि एकमेकांना लंब असणाऱ्या रेषा घ्या मय वर मप=१ मापा व नंतर तिला पव हा लंब काढून पव=क्ष घ्या मग वमप (=ह, समजा) हा इष्ट कोण होय

म हें केंद्र व मव ही त्रिज्या घेऊन वृत्त काढा वम वाढवून तिला वृत्तास व' मध्ये मिळूं द्या मय' वर व'प' लंब

काढा. मग $\angle$यमव' = प्या + इ या कोणाचीहि स्पर्शज्या तितकीच म्हणजे 'क्ष' आहे.

परिभ्रमणरेषा जेव्हां मव किंवा मव' या स्थितींत असते, व दुसऱ्या कोणत्याहि स्थितींत नसते तेव्हांच रेखिलेल्या कोणाची स्पर्शज्या दिलेल्या स्पर्शज्येइतकी असते.

(५·७ अनुच्छेदहि पहा.)

ती मव शीं संपाती होते तेव्हां, घ शून्य किंवा कोणताहि धन या ऋण पूर्णांक असल्यास, तिने रेखिलेला कोण २घ प्या + इ असतो.

ती मव' च्या स्थितींत असते तेव्हां तिने रेखिलेला कोण २ घ प्या + (प्या + इ) म्हणजे (२ घ + १) प्या + इ असतो.

स शून्य किंवा कोणताहि धन वा ऋण पूर्णांक असल्यास वरील कोणांचे दोन्ही संच

स प्या + इ ....................(१)

या पदसंहतींत समाविष्ट होतात.

उपसाध्यः—ज्या कोणांची कोटिस्पर्शज्या इ च्या कोटिस्पर्शज्येइतकी आहे अशा सर्व कोणांचा समावेश पदसंहति (१) मधे होतो.

६·६ निदर्शनात्मक (illustrative) उदाहरणें.

उदाहरण १. (१) ज्यांची ज्या $\frac{१}{\surd २}$ समान आहे,

(२) ज्यांची कोटिज्या $-\frac{\surd ३}{२}$ समान आहे,

(३) ज्यांची स्पर्शज्या $\surd ३$ समान आहे,

अशा सर्व कोणांच्या सामान्य पदसंहती लिहा.

(१) $\frac{१}{\sqrt{२}}$ समान ज्या असणारा अलिप्त कोण ४५°

म्हणजेच $\frac{\text{प्या}}{४}$ आहे.

म्हणून ६·३ या अनुच्छेदानुसार, ज्या कोणाची ज्या $\frac{१}{\sqrt{२}}$ आहे अशा सर्व कोणांची सामान्य पदसहति

$$\text{स प्या} + (-१)^{\text{स}} \frac{\text{प्या}}{४}$$

आहे.

(२) $-\frac{\sqrt{३}}{२}$ ही कोटिज्या असणारा अलिप्त घन कोण १५०° म्हणजेच $\frac{५\text{प्या}}{६}$ आहे.

म्हणून ६·४ या अनुच्छेदानुसार, $-\frac{\sqrt{३}}{२}$ ही कोटिज्या असणाऱ्या सर्व कोणांची सामान्य पदसंहति

$$२\,\text{स प्या} \pm \frac{५\,\text{प्या}}{६}$$

आहे

(३) $\sqrt{3}$ ही स्पर्शज्या असणारा अलिष्ठ धन कोण ६०° म्हणजेच $\frac{\text{प्या}}{3}$ आहे. म्हणून ६.५ या अनुच्छेदानुसार, $\sqrt{3}$ ही स्पर्शज्या असलेल्या सर्व कोणांची सामान्य पदसहति,

$$\text{स प्या} + \frac{\text{प्या}}{3}$$

आहे.

उदाहरण २ ज्या$^2$ अ $= \frac{1}{2}$ हा समीकार सोडवा व अ ची सामान्यतम (most general) गर्हा काढा.

$$\text{ज्या}^2\text{अ} = \frac{1}{2}$$

$$\therefore \quad \text{ज्या अ} = \pm \frac{1}{\sqrt{2}}$$

वरचें चिन्ह घेतल्यास,

$$\text{ज्या अ} = \frac{1}{\sqrt{2}} = \text{ज्या } \frac{\text{प्या}}{4}$$

$$\text{अ} = \text{स प्या} + (-1)^{\text{स}} \frac{\text{प्या}}{4}$$

खालचें चिन्ह घेतल्यास,

$$\text{ज्या अ} = -\frac{1}{\sqrt{2}} = \text{ज्या}\left(-\frac{\text{प्या}}{4}\right)$$

$$\therefore \quad अ = स\,\pi + (-1)^{स}\left(-\frac{\pi}{4}\right)$$

ही दोन्ही फलें (solutions) एकत्र करून,

$$अ = स\,\pi \pm \frac{\pi}{4}$$

उदाहरण ३. कोज्या $अ = \frac{1}{2}$ व स्पअ $= -\frac{1}{\sqrt{3}}$ या दोन्ही समीकारांचें समाधान करणारी अ ची सामान्यतम अर्हा काढा.

$0^\circ$ व $360^\circ$ मधें असणाऱ्या व कोज्या $अ = \frac{1}{2}$ चें समाधान करणाऱ्या अ च्या अर्हा $30^\circ$ व $330^\circ$ या आहेत.

तसेंच, स्प $अ = -\frac{1}{\sqrt{3}}$ चें समाधान करणाऱ्या अ च्या $0^\circ$ व $360^\circ$ मधील अर्हा $150^\circ$ व $330^\circ$ या आहेत.

म्हणून $0^\circ$ व $360^\circ$ मधें असणारी व दोन्ही समीकारांचें समाधान करणारी अ ची अर्हा केवळ $330^\circ$ म्हणजेच $\frac{11\pi}{6}$ आहे.

या कोणाचा चार लम्बकोणांच्या कोणत्याहि अपवर्त्याशीं योग केल्यास सामान्यतम अर्हा मिळेल.

म्हणून $2\,स\,\pi + \frac{11\pi}{6}$ हीच इष्ट अर्हा होय.

## उदाहरणसंग्रह ७

खालील समीकारांचें समाधान करणाऱ्या अ च्या सामान्यतम अर्हा काढा.

(१) $\text{ज्या अ} = \frac{\sqrt{३}}{२}$  (२) $\text{कोज्या अ} = ०$

(३) $\text{कोस्प अ} = -१$  (४) $\text{व्युत्कोज्या}^{२}\text{अ} = ४$

(५) $\text{स्प}^{२}\text{अ} = १$  (६) $४\ \text{व्युत्कोज्या}^{२}\ \text{अ} - ७\text{स्प}^{२}\text{अ} = ३$

(७) स कोणताहि पूर्णांक असल्यास,

$$(२\text{स} - १)\frac{\text{प्या}}{२} + (-१)^{\text{स}}\frac{\text{प्या}}{४} \text{ व } २\text{स प्या} \pm \frac{\text{प्या}}{४}$$

ही दोन्ही सूत्रें एकच कोण दर्शवितात हें सिद्ध करा.

(८) $\text{स प्या} + (-१)^{\text{स}}\ (\text{प्या} - \text{इ})$ व

$\left(२\text{स प्या} \pm ३\frac{\text{प्या}}{२} - \frac{\text{प्या}}{२}\right) \pm \text{इ}$ ही दोन्ही सूत्रें एकच कोण दर्शवितात हें सिद्ध करा.

(९) $\text{कोस्प अ} = १$ व $\text{ज्या अ} = \frac{१}{\sqrt{२}}$ या दोन्ही समीकारांचें समाधान करणारी अ ची सामान्यतम अर्हा काढा.

(१०) $\text{स्पगअ कोस्पनअ} + \text{स्प}\frac{\text{प्या}}{४}\ \text{कोस्प}\ \frac{३\text{प्या}}{४} = ०$

चे समाधान करणाऱ्या अ च्या अहां एक समान्तर श्रेढी निर्माण करतात हें सिद्ध करा आणि तिचा प्रचय (common difference) काढा

६७ ज्या समीकारात एक किंवा अनेक अज्ञात कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती असतात त्या समीकाराला त्रिकोणमितीय समीकार म्हणतात

काही सोपे त्रिकोणमितीय समीकार खाली सोडविले आहेत

उदाहरण १ २ कोज्या$^2$अ + $\sqrt{2}$ ज्या अ = २ हा समीकार सोडवा [कलकत्ता १९०२]

दिलेला समीकार पुढीलप्रमाणेंहि लिहिता येतो

२ (१ − ज्या$^2$अ) + $\sqrt{2}$ ज्या अ = २

किंवा २ − २ज्या$^2$अ + $\sqrt{2}$ ज्या अ = २

$\sqrt{2}$ ज्या अ (१ − $\sqrt{2}$ ज्या अ) = ०

म्हणून, एकतर ज्या अ ० (१)

किंवा १ − $\sqrt{2}$ ज्या अ = ० (२)

(१)वरून,

ज्या अ = ० = ज्या ०

अ = स प्या ही एक सामान्य अहां आहे

(२)वरून,

ज्या अ = $\frac{१}{\sqrt{२}}$ = ज्या $\frac{प्या}{४}$

$\therefore$ अ = स प्या $+(-१)^{स}$ $\frac{\text{प्या}}{४}$ ही दुसरी सामान्य अर्हा आहे.

उदाहरण २. स्प अ = कोस्प त अ हा समीकार सोडवा.

स्प अ = कोस्प त अ

$$= \text{स्प}\left(\frac{\text{प्या}}{२} - \text{त अ}\right)$$

म्हणून, स शून्य किंवा कोणताहि धन वा ऋण पूर्णांक असल्यास,

$$\text{अ} = \text{स प्या} + \left(\frac{\text{प्या}}{२} - \text{त अ}\right)$$

$$\text{किंवा, अ} = \left(\text{स} + \frac{१}{२}\right)\frac{\text{प्या}}{(\text{त}+१)}$$

## उदाहरणसंग्रह ८

पुढील समीकार सोडवा :—

(१) $\text{ज्या}^{२}\text{अ} + \frac{\sqrt{२}-१}{२}\,\text{कोज्या अ} + \frac{१}{\sqrt{२}}\left(\frac{१}{२} - \sqrt{२}\right) = ०$

(२) $\text{व्युज्या}^{२}\text{अ} + \text{कोस्प}^{२}\text{अ} = ३\,\text{कोस्प अ}$

(कलकत्ता १९०८)

(३) $२ स्प^२ य = ७ - ३$ व्युत्कोज्या य (नागपूर १९३९)

(४) $\sqrt{३}$ − ज्या अ कोज्या अ = $\sqrt{३}$ ज्या$^२$अ

(५) ज्या ७ अ = ज्या ३ अ

(६) कोज्या ५ अ = ज्या अ

(७) कोस्प अ = कोस्प $\frac{१}{अ}$

(८) स्प (इ + ई) = $-\frac{१}{\sqrt{३}}$ व कोस्प (इ − ई) = $\sqrt{३}$

(९) कोज्या (३य + ५र) = $\frac{१}{\sqrt{२}}$ व

कोज्या (५य + ३र) = $\frac{१}{२}$

(१०) क कोज्या अ + ख ज्या अ = ग हा समीकार सोडवा व जर $क^२ + ख^२ = ग^२$ असेल तर अ च्या दोन अर्हा समान होतात हें दाखवा. (कलकत्ता १८८२)

## प्रकरण सातवें

# योग आणि वियोग प्रमेयें. गुणनसूत्रें.

७.१ योग प्रमेयें (addition theorems).

ज्या(क + ख) = ज्या क कोज्या ख + कोज्या क ज्या ख

कोज्या(क + ख) = कोज्या क कोज्या ख − ज्या क ज्या ख



आ ७·१

मय पासून निघालेली परिभ्रमणरेषा क समान यमट हा कोण करून नंतर ख समान टमठ हा कोण रेखिते.

∴ ∠यमठ = ∠यमट + ∠टमठ

= क + ख

मठ या मर्यादारेषेवर (bounding line) ब हा एक बिंदु घ्या आणि मय व मट वर अनुक्रमे बभ व बप हे लम्ब

काढा. प पासून मय व यभ वर अनुक्रमे पच व पफ हे लम्ब काढा.

$\angle$मभव व $\angle$मपव लम्बकोण असल्यामुळे म, भ, प, व हे बिंदू संवृत्तीय (concyclic) आहेत.

आता पवभ आणि पमभ हे कोण एकाच खंडात (segment) असल्यामुळे,

$\angle$पवभ = $\angle$पमभ = क

अर्थात् $\angle$पवफ = क

आता, ज्या (क + ख) = ज्या यमठ

$$= \frac{\text{भव}}{\text{मव}} = \frac{\text{भफ} + \text{फव}}{\text{मव}}$$

पफभच आयत (rectangle) आहे;

म्हणून भफ = चप

$$\therefore \text{ज्या (क + ख)} = \frac{\text{चप}}{\text{मव}} + \frac{\text{फव}}{\text{मव}}$$

$$= \frac{\text{चप}}{\text{मप}} \cdot \frac{\text{मप}}{\text{मव}} + \frac{\text{फव}}{\text{पव}} \cdot \frac{\text{पव}}{\text{मव}}$$

आकृतीवरून क आणि ख कोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्तींचा आणि $\angle$पवफ = क याचा उपयोग करून,

ज्या (क + ख) = ज्या क कोज्या ख + कोज्या क ज्या ख

पुन्हा कोज्या (क + ख) $= \frac{\text{मभ}}{\text{मव}}$

$$= \frac{\text{मच} - \text{भच}}{\text{मव}}$$

पफभच आयत असल्यामुळें भच = फप

$$\therefore \text{ कोज्या } (\text{क}+\text{ख}) = \frac{\text{मच}}{\text{मव}} - \frac{\text{फप}}{\text{मव}}$$

$$= \frac{\text{मच}}{\text{मप}} \cdot \frac{\text{मप}}{\text{मव}} - \frac{\text{फप}}{\text{पव}} \cdot \frac{\text{पव}}{\text{मव}}$$

क आणि ख कोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती आणि ∠पवफ = क याचा उपयोग करून,

कोज्या (क + ख) = कोज्या क कोज्या ख − ज्या क ज्या ख

७·११ मागील अनुच्छेदाच्या आकृतींत क आणि ख हे दोन्ही कोण धन आणि न्यून काढले आहेत. परंतु या कोणांचें परिमाण कांहीहि असलें तरी वर दिलेल्या सिद्धतेतील राशींच्या चिन्हांकडे योग्य लक्ष दिल्यास तीच सिद्धता सर्व प्रकारांत लागूं पडेल.

वरील प्रमेयें कोणांचें परिमाण कांहीहि असलें तरी सत्य आहेत हें पुढें दिल्याप्रमाणेंहि दाखविता येतें.

प्रथम क व ख हे दोन्ही कोण न्यून आहेत असें समजा. म्हणजे वरील प्रमेयें सत्य राहतील.

आता $\text{क}_1 = ९०^\circ + \text{क}$

व $\text{ख}_1 = \text{ख}$ घ्या.

$\text{ज्या } (\text{क}_1 + \text{ख}_1) = \text{ज्या}(९०^\circ + \overline{\text{क}+\text{ख}}) = \text{कोज्या}(\text{क}+\text{ख})$

= कोज्या क कोज्या ख − ज्या क ज्या ख
(७·१ अनुच्छेदानें)

परंतु ज्या (९०° + क) = कोज्या क

आणि कोज्या (९०° + क) = − ज्या क

∴ ज्या (क$_1$ + ख$_1$) = ज्या (९०° + क) कोज्या ख
+ कोज्या (९०° + क) ज्या ख

= ज्या क$_1$ कोज्या ख$_1$ + कोज्या क$_1$ ज्या ख$_1$
.........(१)

तसेंच,

कोज्या (क$_1$ + ख$_1$) = कोज्या (९०° + $\overline{\text{क} + \text{ख}}$)

= − ज्या (क + ख)

= − ज्या क कोज्या ख
− कोज्या क ज्या ख
(७·१ अनुच्छेदानें)

= कोज्या (९०° + क) कोज्या ख
− ज्या (९०° + क) ज्या ख

= कोज्या क$_1$ कोज्याख$_1$
− ज्याक$_1$ ज्या ख$_1$
.........(२)

ख$_1$, ख समान असण्याऐवजी, ९०° + ख समान असला तरी वर दिल्याप्रमाणेंच रीत लागूं पडेल.

(१) व (२) या संबंधांवरून असें दिसून येईल की क आणि ख कोण ९०° नें वाढविलें तरी योगप्रमेयें सत्य राहतात.

त्याचप्रमाणें क$_2$ = ९०° + क$_1$ घेऊन, क आणि ख कोण ०° आणि २७०° मधें असल्यास योग प्रमेयांची सत्यता दाखवितां येईल.

अशाच रीतीचा अवलंब केला असतां वरील योगप्रमेयें, कोणांच्या कितीहि महत्ता असल्या तरी सत्य राहतात हें दिसून येईल.

७२ वियोग प्रमेयें ( subtraction theorems).
ज्या (क – ख) = ज्या क कोज्या ख – कोज्या क ज्या ख
कोज्या (क – ख) = कोज्या क कोज्या ख + ज्या क ज्या ख




आ ७२

परिभ्रमणरेषा मय पासून निघून क समान यमट हा कोण रेखिते आणि नंतर ख कोणाइतकें घटीवत् भ्रमण करून मठ या स्थितींत येते.

तेव्हां ∠यमठ = ∠यमट – ∠टमठ
= क – ख

मठ या मर्यादारेषेवर ब हा एक बिंदु घेऊन मय व मट वर अनुक्रमें बभ व बप हे लम्ब काढा. प बिंदूतून मय ला पच लम्ब काढा व भब वाढवून तिला पफ हा लम्ब काढा.

आता $\angle$ मभर + $\angle$ मपव = १८०°

$\because$ भमरप हा चक्रिक (cyclic) चौकोन आहे.

$$\therefore \angle \text{परफ} = \angle \text{भमप} = \text{क}$$

आता ज्या (क − ख) = $\frac{\text{भर}}{\text{मर}} = \frac{\text{भफ} - \text{वफ}}{\text{मर}}$

पफभच आयत आहे. म्हणून भफ = चप

$\therefore$ ज्या (क − ख) = $\frac{\text{चप}}{\text{मर}} - \frac{\text{वफ}}{\text{मर}}$

$$= \frac{\text{चप}}{\text{मप}} \cdot \frac{\text{मप}}{\text{मर}} - \frac{\text{वफ}}{\text{वप}} \cdot \frac{\text{वप}}{\text{मर}}$$

आकृतीवरून क आणि ख कोनांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती आणि $\angle$ परफ = क याचा उपयोग करून,

ज्या ( क − ख ) = ज्या क कोज्या ख − कोज्या क ज्याख

पुन्हा कोज्या(क − ख) = $\frac{\text{मभ}}{\text{मर}}$

$$= \frac{\text{मच} + \text{चभ}}{\text{मर}}$$

पफभच आयत असल्यामुळे चभ = पफ

$$\text{कोज्या (क − ख)} = \frac{\text{मच}}{\text{मव}} + \frac{\text{पफ}}{\text{मव}}$$

$$= \frac{\text{मच}}{\text{मव}} \cdot \frac{\text{मप}}{\text{मव}} + \frac{\text{पफ}}{\text{पव}} \cdot \frac{\text{पव}}{\text{मव}}$$

आकृतीवरून क आणि ख कोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती आणि ∠ पत्रफ = क यांचा उपयोग करून,

कोज्या (क − ख) = कोज्या क कोज्या ख + ज्या क ज्या ख

अभ्यास :— ७·११ अनुच्छेदांत दर्शविल्याप्रमाणे वरील सिद्धता, कोणांची महत्ता कांहीहि असली तरी लागू पडते हें सिद्ध करा.

७·३ (१) $\text{स्प} (\text{क}+\text{ख}) = \dfrac{\text{स्प क} + \text{स्प ख}}{१ - \text{स्प क स्प ख}}$

आणि (२) $\text{स्प} (\text{क}-\text{ख}) = \dfrac{\text{स्प क} - \text{स्प ख}}{१ + \text{स्प क स्प ख}}$

हें सिद्ध करणें.

$$\text{स्प} (\text{क}+\text{ख}) = \frac{\text{ज्या} (\text{क}+\text{ख})}{\text{कोज्या} (\text{क}+\text{ख})}$$

$$= \frac{\text{ज्या क कोज्या ख} + \text{कोज्या क ज्या ख}}{\text{कोज्या क कोज्या ख} - \text{ज्या क ज्या ख}}$$

आता, अंश व हर यांना कोज्या क कोज्या ख ने भागून,

$$\text{स्प} (\text{क}+\text{ख}) = \frac{\dfrac{\text{ज्याक}}{\text{कोज्याक}} + \dfrac{\text{ज्या ख}}{\text{कोज्या ख}}}{१ - \dfrac{\text{ज्याक}}{\text{कोज्या क}} \times \dfrac{\text{ज्या ख}}{\text{कोज्या ख}}}$$

म्हणून $\text{स्प} (\text{क}+\text{ख}) = \dfrac{\text{स्प क} + \text{स्प ख}}{१ - \text{स्पक स्प ख}}$

पुन्हा $\text{स्प} (\text{क}-\text{ख}) = \dfrac{\text{ज्या} (\text{क}-\text{ख})}{\text{कोज्या} (\text{क}-\text{ख})}$

$$= \frac{१ + \frac{१}{\sqrt{३}}}{१ - \frac{१}{\sqrt{३}}}$$

$$= \frac{\sqrt{३} + १}{\sqrt{३} - १}$$

$$= २ + \sqrt{३}$$

आता, ७५° व १५° हे लंबपूरक कोण आहेत म्हणून १५° च्या निष्पत्ति ७५° च्या निष्पत्तींवरून लिहिता येतात.

$$\text{ज्या } १५° = \frac{\sqrt{३} - १}{२\sqrt{२}}$$

$$\text{कोज्या } १५° = \text{ज्या } ७५° = \frac{\sqrt{३} + १}{२\sqrt{२}}$$

$$\text{स्प } १५° = \text{कोस्प} ७५° = २ - \sqrt{३}$$

वियोगप्रमेयांचा ( ४५°–३०° ) करिता उपयोग करूनहि १५° च्या निष्पत्ती काढतां येतात

उदाहरण २. योगप्रमेयें गृहीत धरून वियोगप्रमेयें काढा.

$$\text{ज्या } (\text{क} + \text{ख}) = \text{ज्या क कोज्या ख} + \text{कोज्या क ज्या ख}$$

$$\text{कोज्या } (\text{क} + \text{ख}) = \text{कोज्या क कोज्या ख} - \text{ज्या क ज्या ख}$$

$$\text{आणि स्प } (\text{क} + \text{ख}) = \frac{\text{स्प क} + \text{स्प ख}}{१ - \text{स्प क स्प ख}}$$

यांपैकी प्रत्येकांत ख च्या जागीं –ख लिहा.

ज्या (क − ख) = ज्या क कोज्या (−ख)
+ कोज्या क ज्या (−ख)
= ज्या क कोज्या ख
− कोज्या क ज्या ख
(५·२ अनुच्छेदाने)

तसेंच, कोज्या (क − ख) = कोज्या क कोज्या(−ख)
− ज्या क ज्या (−ख)
= कोज्या क कोज्या ख + ज्या क ज्या ख

आणि स्प (क − ख) = $\frac{\text{स्प क + स्प (−ख)}}{\text{१ − स्प क स्प(−ख)}}$
= $\frac{\text{स्प क − स्प ख}}{\text{१ + स्प क स्प ख}}$

याच रीतीनें आपणांस वियोगप्रमेयांवरून योगप्रमेयें काढतां येतील.

उदाहरण ३. योग व वियोग प्रमेयांचा उपयोग करून ५ व्या प्रकरणांतील कोणताहि संबंध काढतां येतो.

उदाहरणार्थ, ज्या (−अ) = ज्या (० − अ)
= ज्या० कोज्या अ − कोज्या ० ज्या अ
(७·२ अनुच्छेदानें)
= ० कोज्या अ − १. ज्या अ
= − ज्या अ

ज्या (९०° + अ) = ज्या९०° कोज्या अ + कोज्या९०° ज्या अ
(७·१ अनुच्छेदानें)
= १. कोज्या अ + ०. ज्या अ
= कोज्या अ

$$\text{स्प}\,(\text{प्या} - \text{अ}) = \frac{\text{स्प प्या} - \text{स्प अ}}{१ + \text{स्प प्या स्प अ}}$$

(७.३ अनुच्छेदाने)

$$= \frac{० - \text{स्प अ}}{१ + ०.\text{स्प अ}}$$

$$= -\text{स्प अ}$$

$$\text{कोज्या}\,(\text{प्या} + \text{अ}) = \text{कोज्या प्या कोज्या अ} - \text{ज्या प्या ज्या अ}$$

(७.१ अनुच्छेदाने)

$$= -१.\text{कोज्या अ} - ०.\text{ज्या अ}$$

$$= -\text{कोज्या अ}$$

उदाहरण ४. सिद्ध करा:—

$$\text{कोज्या}\,(\text{क}+\text{ख})\,\text{कोज्या}\,(\text{क}-\text{ख}) = \text{कोज्या}^{२}\text{क} - \text{ज्या}^{२}\text{ख}$$

आणि

$$\text{ज्या}\,(\text{क}+\text{ख})\,\text{ज्या}\,(\text{क}-\text{ख}) = \text{कोज्या}^{२}\text{क} - \text{कोज्या}^{२}\text{ख}$$

७.१ व ७.२ या अनुच्छेदांवरून,

$$\text{कोज्या}\,(\text{क}+\text{ख})\,\text{कोज्या}\,(\text{क}-\text{ख})$$

$$= (\text{कोज्या क कोज्या ख} - \text{ज्या क ज्या ख}) \times (\text{कोज्या क कोज्या ख} + \text{ज्या क ज्या ख})$$

$$= \text{कोज्या}^{२}\text{क कोज्या}^{२}\text{ख} - \text{ज्या}^{२}\text{क ज्या}^{२}\text{ख}$$

$$= \text{कोज्या}^{२}\text{क}\,(१ - \text{ज्या}^{२}\text{ख}) - (१ - \text{कोज्या}^{२}\text{क})\,\text{ज्या}^{२}\text{ख}$$

$$= \text{कोज्या}^{२}\text{क} - \text{ज्या}^{२}\text{ख}$$

त्याच अनुच्छेदांवरून,

ज्या (क + ख) ज्या (क − ख)

$$= (\text{ज्या क कोज्या ख} + \text{कोज्या क ज्या ख}) \times (\text{ज्या क कोज्या ख} - \text{कोज्या क ज्या ख})$$

$$= \text{ज्या}^2\text{क कोज्या}^2\text{ ख} - \text{कोज्या}^2\text{क ज्या}^2\text{ ख}$$

$$= (१ - \text{कोज्या}^2\text{ क})\ \text{कोज्या}^2\text{ ख} - \text{कोज्या}^2\text{क}\ (१ - \text{कोज्या}^2\text{ ख})$$

$$= \text{कोज्या}^2\text{ ख} - \text{कोज्या}^2\text{ क}$$

उदाहरण ५. सिद्ध करा:—

$$\frac{\text{कोज्या } ९^\circ + \text{ज्या } ९^\circ}{\text{कोज्या } ९^\circ - \text{ज्या } ९^\circ} = \text{स्प } ५४^\circ$$

$$\text{स्प } ५४^\circ = \text{स्प } (४५^\circ + ९^\circ)$$

$$= \frac{\text{स्प } ४५^\circ + \text{स्प } ९^\circ}{१ - \text{स्प } ४५^\circ \text{ स्प} ९^\circ} \quad (\text{७.३ अनुच्छेदाने})$$

$$= \frac{१ + \text{स्प } ९^\circ}{१ - \text{स्प } ९^\circ}$$

$$= \frac{१ + \frac{\text{ज्या } ९^\circ}{\text{कोज्या } ९^\circ}}{१ - \frac{\text{ज्या } ९^\circ}{\text{कोज्या } ९^\circ}}$$

$$= \frac{\text{कोज्या } ९^\circ + \text{ज्या } ९^\circ}{\text{कोज्या } ९^\circ - \text{ज्या } ९^\circ}$$

# उदाहरणसंग्रह ९

(१) जर ज्या इ $= \frac{५}{१३}$ व कोज्या ई $= \frac{४}{५}$ असतील तर ज्या (इ + ई), कोज्या (इ − ई) व स्प(इ − ई) यांची मानें काढा.

(२) जर स्प उ $= \frac{६}{७}$ व स्प ऊ $= \frac{१}{१३}$ असतील तर उ + ऊ $= \frac{\text{π}}{४}$ हें सिद्ध करा

(३) जर स्प क $= \frac{१}{४}$ आणि स्प ख $= \frac{३}{५}$ असतील तर (क + ख) काढा.

सिद्ध करा :—

(४) [ज्या (६०° − अ) कोज्या (३०° − आ) + कोज्या(६०° − अ) ज्या(३०° − आ)] = कोज्या (अ + आ)

(५) [कोज्या (८०° + अ) कोज्या (८०° − अ) + ज्या(८०° + अ)ज्या(८०° − अ)] = कोज्या २ अ

(६) कोज्या ७५° + ज्या १०५° = ज्या ७५° − कोज्या १०५°

(७) $\frac{\text{ज्या (क − ख)}}{\text{ज्या क ज्या ख}} + \frac{\text{ज्या (ख − ग)}}{\text{ज्या ख ज्या ग}} + \frac{\text{ज्या (ग − क)}}{\text{ज्या ग ज्या क}} = ०$

(८) $\left\{ \text{ज्या}(\text{अ}+\text{आ})\text{कोज्या इ} - \text{कोज्या}(\text{आ}+\text{इ})\,\text{ज्या अ} \right\}$
$= \text{ज्या आ कोज्या } (\text{इ} - \text{अ})$

(९) $\text{कोस्प क} - \text{कोस्प २ क} = \text{व्युज्ज्या २ क}$
[कलकत्ता १८७०

(१०) $१ + \text{स्प अ स्प२अ} - \text{व्युत्कोज्या २अ} = ०$
[कलकत्ता १८५७

(११) $\dfrac{१+\text{स्प क कोस्प ख}}{\text{कोस्प ख} - \text{स्प क}} = \text{स्प } (\text{क}+\text{ख})$

(१२) $\text{स्प}\dfrac{\text{प्या}}{४} + \text{स्प}\dfrac{\text{प्या}}{६}\,\text{स्प}\dfrac{\text{प्या}}{१२} = \sqrt{१+\text{स्प}^{२}\dfrac{\text{प्या}}{६}}$

(१३) $\text{स्प}\left(\dfrac{\text{प्या}}{४}+\text{अ}\right)\text{स्प}\left(\dfrac{\text{प्या}}{४}-\text{अ}\right)$
$+\text{कोस्प}\left(\dfrac{\text{प्या}}{४}+\text{अ}\right)\text{कोस्प}\left(\dfrac{३\text{प्या}}{४}+\text{अ}\right)$
$= ०$

(१४) $\text{स्प } ५०^\circ + \text{स्प}१०^\circ + \sqrt{३}\,\text{स्प } ५०^\circ\,\text{स्प}१०^\circ = \sqrt{३}$

(१५) $\text{स्प } (४५^\circ + \text{क})\,\text{स्प } (४५^\circ - \text{क}) = १$

(१६) जर $\text{स्प ग} = \dfrac{\text{स ज्या क कोज्या क}}{१ - \text{स ज्या}^{२}\text{क}}$ असेल तर
$\text{स्प } (\text{क} - \text{ग}) = (१ - \text{स})\,\text{स्प क}$ हें दाखवा.
[पाटणा १९४१

(१७) क च्या सर्व मानांकरिता,

$$\frac{\text{कोस्प क}}{१+\text{कोस्प क}} \cdot \frac{\text{कोस्प } (४५^\circ - \text{क})}{१+\text{कोस्प } (४५^\circ - \text{क})} \text{ चें मान एकच}$$

राहते हें दाखवा. [पाटणा १९४२

(१८) क कोनाचे असे दोन भाग केले की त्या भागांच्या स्पर्शज्यांची निष्पत्ति न, आणि त्या भागांमधील फरक य आहे. तर

$$\text{ज्या य} = \frac{\text{न} - १}{\text{न} + १} \text{ ज्या क}$$

हें दाखवा. [अलाहाबाद १९४५

७·६ गुणनफलांचें (products) योग किंवा वियोग फलांत रूपांतर.

७·१ व ७·२ या अनुच्छेदांवरून,

$$\text{ज्या (क + ख)} = \text{ज्या क कोज्या ख} + \text{कोज्या क ज्या ख} \quad \dots (\text{अ})$$

$$\text{ज्या (क − ख)} = \text{ज्या क कोज्या ख} - \text{कोज्या क ज्या ख} \quad \dots (\text{आ})$$

$$\text{कोज्या (क + ख)} = \text{कोज्या क कोज्या ख} - \text{ज्या क ज्या ख} \quad \dots (\text{इ})$$

$$\text{कोज्या (क − ख)} = \text{कोज्या क कोज्या ख} + \text{ज्या क ज्या ख} \quad \dots (\text{ई})$$

(अ) आणि (आ) यांचा योग करून,

ज्या (क + ख) + ज्या (क − ख)

= २ज्या क कोज्या ख ... (१)

(अ) तून (आ) चा वियोग करून,

ज्या (क + ख) − ज्या (क − ख)

= २कोज्या क ज्या ख ... (२)

(इ) व (ई) चा योग करून,

कोज्या (क + ख) + कोज्या (क − ख)

= २कोज्या क कोज्या ख...(३)

(ई) तून (इ) चा वियोग करून,

कोज्या (क − ख) − कोज्या (क + ख)

= २ज्या क ज्या ख ... (४)

वरील चार सूत्रें आपण पुन्हा खालीलप्रमाणे लिहूं.

२ज्या क कोज्या ख = ज्या (क + ख)

+ ज्या (क − ख) ... (५)

२कोज्या क ज्या ख = ज्या (क + ख)

− ज्या (क − ख) ... (६)

२कोज्या क कोज्या ख = कोज्या (क + ख)

+ कोज्या (क − ख) ... (७)

२ज्या क ज्या ख = कोज्या (क − ख)

− कोज्या (क + ख) . (८)

(५) ते (८) हीं चार सूत्रें दोन कोणांच्या ज्या आणि कोटिज्या यांच्या गुणनफलाचें, त्या कोणांच्या दोन ज्यांच्या किंवा दोन कोटिज्यांच्या योगांत वा वियोगांत रूपांतर करतात.

७·७ योग अथवा वियोग फलांचें गुणनफलांत रूपांतर.

समजा $क + ख = ग$ व $क - ख = घ$

तर $क = \frac{ग + घ}{२}$ आणि $ख = \frac{ग - घ}{२}$

मागील अनुच्छेदाचें (४) थें सूत्र

$कोज्या(क + ख) - कोज्या(क - ख) = -२ ज्या क ज्या ख$
$= २ ज्या क ज्या(-ख)$

असेंहि लिहितां येते हें घ्यानांत ठेवून ७·६ अनुच्छेदाच्या (१), (२), (३), (४) या फलांत क व ख करिता अनुक्रमें $\frac{ग + घ}{२}$ व $\frac{ग - घ}{२}$ हे आदेश (substitutions) करा.

त्यामुळे केवळ दोन ज्या किंवा केवळ दोन कोटिज्या यांच्या योगांचें अथवा वियोगांचें, ज्या व कोटिज्या यांच्या गुणाकारांत रूपांतर करणारीं खालील चार सूत्रें आपणांस मिळतात.

$ज्या ग + ज्या घ = २ ज्या \frac{ग + घ}{२} कोज्या \frac{ग - घ}{२}$ ... (१)

$ज्या ग - ज्या घ = २ कोज्या \frac{ग + घ}{२} ज्या \frac{ग - घ}{२}$ ... (२)

$कोज्या ग + कोज्या घ = २ कोज्या \frac{ग + घ}{२} कोज्या \frac{ग - घ}{२}$ ... (३)

$कोज्या ग - कोज्या घ = २ ज्या \frac{ग + घ}{२} ज्या \frac{घ - ग}{२}$ ... (४)

या सूत्रांना गुणनसूत्रें म्हणतात.

७८ दिलेली ज्या असणाऱ्या सर्व कोणांची सामान्य पदसंहति काढा.

समजा दिलेली ज्या असणारा इ हा अविष्ठ कोण आहे, व तितकीच ज्या असणारा अ हा दुसरा एक कोण आहे.

आता आपणांस ज्या अ = ज्या इ या समीकराचें समाधान करणारी अ ची सामान्यतम अर्हा काढावयाची आहे.

$$ज्या\ अ = ज्या\ इ$$

किंवा $ज्या\ अ - ज्या\ इ = ०$

म्हणून ७७ अनुच्छेदांतील (२) वरून,

$$२ज्या \frac{अ - इ}{२} कोज्या \frac{अ + इ}{२} = ०$$

म्हणून, एकतर $ज्या\ \frac{अ - इ}{२} = ०$

अर्थात् $\frac{१}{२}(अ - इ)$ = प्या चा कोणताहि अपवर्त्य

$$= घ\ प्या$$

अर्थात् $अ = २\ घ\ प्या + इ$ ............(१)

किंवा $कोज्या \frac{अ + इ}{२} = ०$

म्हणजे $\frac{\text{अ}+\text{इ}}{२} = \frac{\text{प्या}}{२}$ चा कोणताहि विषम अवयव

$$= (२\text{घ}+१)\frac{\text{प्या}}{२}$$

अर्थात् $\text{अ} = -\text{इ} + (२\text{घ}+१)\,\text{प्या}$ ..................(२)

म शून्य किंवा कोणताहि धन या ऋण पूर्णांक असेल तर वरील दोन्ही अहां $\text{अ} = \text{म}\,\text{प्या} + (-१)^{\text{म}}\,\text{इ}$ या पदसंहतींत समाविष्ट होतात.

अशाच रीतीने दिलेली कोटिज्या किंवा दिलेली स्पर्शज्या असणाऱ्या सर्व कोणांच्या सामान्य पदसंहती काढतां येतात.

७·९. उदाहरण १. सिद्ध करा :—

$$२\text{ज्या}\frac{\text{प्या}}{११}\ \text{ज्या}\ \frac{७\ \text{प्या}}{११} + \text{ज्या}\ \frac{\text{प्या}}{२२} - \text{ज्या}\ \frac{५\ \text{प्या}}{२२} = ०$$

(७·६) अनुच्छेदांतील (८) वरून,

$$२\text{ज्या}\frac{\text{प्या}}{११}\ \text{ज्या}\ \frac{७\ \text{प्या}}{११} = \text{कोज्या}\ \frac{६\ \text{प्या}}{११} - \text{कोज्या}\ \frac{८\ \text{प्या}}{११}$$

$$\text{परंतु कोज्या}\ \frac{६\text{प्या}}{११} = \text{कोज्या}\left(\frac{\text{प्या}}{२} + \frac{\text{प्या}}{२२}\right)$$

$$= -\text{ज्या } \frac{\text{π्या}}{२२}$$

$$\text{आणि कोज्या } \frac{८\text{π्या}}{११} = \text{ज्या}\left(\frac{\text{π्या}}{२} - \frac{८\text{π्या}}{११}\right)$$

$$= \text{ज्या } \left(-\frac{५\text{π्या}}{२२}\right)$$

$$= -\text{ज्या } \frac{५\text{π्या}}{२२}$$

$$\text{म्हणून } २\text{ज्या } \frac{\text{π्या}}{११} \text{ज्या } \frac{७\text{π्या}}{११} = -\text{ज्या } \frac{\text{π्या}}{२२} + \text{ज्या } \frac{५\text{π्या}}{२२}$$

$$\text{किंवा } २\text{ज्या } \frac{\text{π्या}}{११} \text{ज्या } \frac{७\text{π्या}}{११} + \text{ज्या } \frac{\text{π्या}}{२२} - \text{ज्या } \frac{५\text{π्या}}{२२} = ०$$

उदाहरण २. सरळ रूप द्या :—

$$\frac{\text{ज्या अ} + \text{ज्या } २\text{ अ} + \text{ज्या } ३\text{ अ} + \text{ज्या } ४\text{ अ}}{\text{कोज्या अ} + \text{कोज्या } २\text{ अ} + \text{कोज्या } ३\text{ अ} + \text{कोज्या } ४\text{ अ}}$$

आता, ज्या अ + ज्या २ अ + ज्या ३ अ + ज्या ४ अ

$$= (\text{ज्या अ} + \text{ज्या } ४\text{ अ}) + (\text{ज्या } २\text{ अ} + \text{ज्या } ३\text{ अ})$$

$$= २\text{ज्या } \frac{५\text{अ}}{२} \text{ कोज्या } \frac{३\text{अ}}{२} + २\text{ज्या } \frac{५\text{अ}}{२} \text{ कोज्या } \frac{\text{अ}}{२}$$

(७·७ अनुच्छेदाने)

$$= २ज्या\,\frac{५अ}{२}\left(कोज्या\,\frac{३अ}{२} + कोज्या\,\frac{अ}{२}\right)$$

शिवाय, कोज्या अ + कोज्या २ अ + कोज्या ३ अ + कोज्या ४ अ

$$= (कोज्या\,अ + कोज्या\,४अ) + (कोज्या\,२अ + कोज्या\,३अ)$$

$$= २कोज्या\,\frac{५अ}{२}कोज्या\,\frac{३अ}{२} + २कोज्या\,\frac{५अ}{२}कोज्या\,\frac{अ}{२}$$

(७·७ अनुच्छेदाने)

$$= २कोज्या\,\frac{५अ}{२}\left(कोज्या\,\frac{३अ}{२} + कोज्या\,\frac{अ}{२}\right)$$

म्हणून, दिलेली पदसंहति

$$= \frac{२ज्या\,\frac{५अ}{२}\left(कोज्या\,\frac{३अ}{२} + कोज्या\,\frac{अ}{२}\right)}{२कोज्या\,\frac{५अ}{२}\left(कोज्या\,\frac{३अ}{२} + कोज्या\,\frac{अ}{२}\right)}$$

$$= स्प\,\frac{५अ}{२}$$

# उदाहरणसंग्रह १०

(१) $\text{ज्या क} = \frac{१}{\sqrt{२}}$ व $\text{ज्या ख} = \frac{१}{\sqrt{३}}$ असल्यास

$\text{स्प}\left(\frac{\text{क}+\text{ख}}{२}\right) \text{कोस्प}\left(\frac{\text{क}-\text{ख}}{२}\right)$ चें मान काढा.

[कलकत्ता १८७५

सिद्ध कराः—

(२) $\frac{\text{कोज्या २क} - \text{कोज्या ४क}}{\text{ज्या ४क} - \text{ज्या २क}} = \text{स्प ३क}$

[कलकत्ता १८९३

(३) $\frac{\text{ज्या क} + \text{ज्या ख}}{\text{कोज्या क} + \text{कोज्या ख}} = \text{स्प}\frac{\text{क}+\text{ख}}{२}$

[कलकत्ता १८७३

(४) $\text{कोज्या क} + \text{कोज्या } (१२०^\circ + \text{क}) + \text{कोज्या}(१२०^\circ - \text{क}) = ०$

[कलकत्ता १९१७

(५) $\frac{\text{ज्या३अ} - \text{२ज्या७अ} + \text{ज्या११अ}}{\text{कोज्या३अ} - \text{२कोज्या ७अ} + \text{कोज्या ११अ}} = \text{स्प ७अ}$

(६) कोज्या२क + कोज्या ४क + कोज्या ६क + कोज्या ८क
= ४कोज्या क कोज्या २क कोज्या ५क
[कलकत्ता १८८७

(७) ज्या १०° + ज्या २०° + ज्या ४०° + ज्या ५०°
= ज्या ७०° + ज्या ८०°

(८) कोज्या ५५° + कोज्या ६५° + कोज्या १७५° = ०
[कलकत्ता १८७६

(९) स्प ७०° = २ स्प ५०° + स्प २०°
[बनारस १९४३

(१०) ज्या २०° ज्या ४०° ज्या ६०° ज्या ८०° $= \frac{३}{१६}$
[नागपूर १९३६

(११) कोज्या १५° − ज्या १५° $= \frac{१}{\sqrt{२}}$
[बनारस १९३८

(१२) स्प $\frac{क + ख}{२}$ + स्प $\frac{क - ख}{२}$ $= \frac{२ \text{ ज्या क}}{\text{कोज्या क} + \text{कोज्या ख}}$
[बनारस १९३९

(१३) जर (व्युज्ज्या क + व्युत्कोज्या क)

$= ($व्युज्ज्या ख + व्युत्कोज्या ख$)$ असेल तर

स्पक स्पख $=$ कोस्प $\left(\frac{\text{क}+\text{ख}}{२}\right)$ हें दाखवा.

[पाटणा १९३६

(१४) जर $\frac{\text{स्प अ}}{\text{य}} = \frac{\text{स्प आ}}{\text{र}} = \frac{\text{स्प इ}}{\text{ल}}$ असेल तर

$\left(\frac{\text{र}+\text{ल}}{\text{र}-\text{ल}}\right)$ ज्या$^{२}$(आ $-$ इ) $+ \left(\frac{\text{ल}+\text{य}}{\text{ल}-\text{य}}\right)$ज्या$^{२}$ (इ $-$ अ)

$+ \left(\frac{\text{य}+\text{र}}{\text{य}-\text{र}}\right)$ ज्या$^{२}$ (अ $-$ आ) $= ०$ हें सिद्ध करा.

[ बनारस १९२७

सिद्ध कराः—

(१५) $\frac{\text{ज्या११क ज्याक + ज्या७क ज्या३क}}{\text{कोज्या ११ क ज्या क + कोज्या७क ज्या३क}}$

$=$ स्प ८ क [पंजाब १९१२

(१६) कोज्या २ अ कोज्या $\frac{\text{अ}}{२}$ $-$ कोज्या अ कोज्या $\frac{७\text{ अ}}{२}$

$=$ ज्या $\frac{३\text{ अ}}{२}$ ज्या ३ अ

(१७) ज्या $\frac{११\text{ अ}}{४}$ ज्या $\frac{\text{अ}}{४}$ $+$ ज्या $\frac{७\text{ अ}}{४}$ ज्या $\frac{३\text{ अ}}{४}$

$=$ ज्या २ अ ज्या अ

[कलकत्ता १९०४

(१८) $ज्या \frac{क - ख - ग}{२} ज्या \frac{ख - ग}{२}$

$$+ ज्या \frac{ख + क - ग}{२} ज्या \frac{ख + ग}{२}$$

$$= ज्या ख \ ज्या \frac{क}{२}$$

[कलकत्ता १८८५

# प्रकरण आठवें

## अपवर्त्य आणि अपवर्त्तक कोणांच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती

### अपवर्त्य कोण

८.१ २क कोणाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती क कोणाच्या निष्पत्तींच्या रूपांत काढणें.

७.१ या अनुच्छेदाच्या सूत्रांमधे ख=क ठेवल्यास

$\text{ज्या } २\text{क} = \text{ज्या क कोज्या क} + \text{कोज्या क ज्याक}$

$= २ \text{ ज्या क कोज्या क} \ldots\ldots\ldots\ldots\ldots\ldots\ldots\ldots (१)$

$\text{कोज्या } २\text{क} = \text{कोज्या क कोज्या क} - \text{ज्याक ज्याक}$

$= \text{कोज्या}^{२} \text{क} - \text{ज्या}^{२} \text{क}$

आता, $\text{कोज्या}^{२}\text{क} - \text{ज्या}^{२}\text{क} = \text{कोज्या}^{२}\text{क} - (१ - \text{कोज्या}^{२}\text{क})$

$= २\text{कोज्या}^{२}\text{क} - १$

$= २(१ - \text{ज्या}^{२}\text{क}) - १$

$= १ - २ \text{ ज्या}^{२}\text{क}$

$\therefore$ कोज्या २ क = कोज्या²क − ज्या²क

= २ कोज्या²क − १

= १ − २ज्या²क ..................(२)

पुन्हा स्प २ क = $\frac{\text{ज्या २ क}}{\text{कोज्या २ क}}$

= $\frac{\text{२ ज्या क कोज्या क}}{\text{कोज्या² क − ज्या² क}}$

अंश व हर या दोहोंस कोज्या²क ने भागून

स्प २ क = $\frac{\text{२ स्प क}}{\text{१ − स्प² क}}$ ...... ......(३)

७·२ या अनुच्छेदांतील सूत्र (१) मध्ये ख = क ठेवूनहि सूत्र (३) मिळविता येतें

जसें, स्प२ क = $\frac{\text{स्प क + स्प क}}{\text{१ − स्प क·स्प क}}$

= $\frac{\text{२ स्प क}}{\text{१ − स्प² क}}$

उपसाध्य :— सूत्र (२) वरून

$$१ + \text{कोज्या } २\text{क} = २\ \text{कोज्या}^२\text{क}$$

$$\text{आणि } १ - \text{कोज्या } २\text{क} = २\ \text{ज्या}^२\text{क}$$

८·२ ३क कोनाच्या त्रिकोणमितीय निष्पत्ती क च्या निष्पत्तींच्या रूपात काढणे

$$\begin{aligned}
\text{ज्या } ३\text{क} &= \text{ज्या } (२\text{क} + \text{क}) \\
&= \text{ज्या } २\text{क कोज्या क} + \text{कोज्या } २\text{क ज्या क} \\
&= २\text{ज्या क कोज्या क}.\text{कोज्या क} + (\text{कोज्या}^२\text{क} - \text{ज्या}^२\text{क})\ \text{ज्या क} \\
&= ३\text{ज्या क कोज्या}^२\text{क} - \text{ज्या}^३\text{क} \\
&= ३\text{ज्या क } (१ - \text{ज्या}^२\text{क}) - \text{ज्या}^३\text{क}
\end{aligned}$$

$$\text{ज्या}३\text{क} = ३\text{ज्या क} - ४\text{ज्या}^३\text{क} \qquad (४)$$

$$\begin{aligned}
\text{कोज्या}३\text{क} &= \text{कोज्या}(२\text{क} + \text{क}) \\
&= \text{कोज्या}२\text{क कोज्या क} - \text{ज्या}२\text{क ज्या क} \\
&= (२\text{कोज्या}^२\text{ क} - १)\ \text{कोज्या क} - २\text{ज्या क कोज्याक ज्याक} \\
&= २\text{कोज्या}^३\text{ क} - \text{कोज्या क} - २\text{कोज्या क} \times (१ - \text{कोज्या}^२\text{ क})
\end{aligned}$$

$$\text{कोज्या } ३\text{ क} = ४\ \text{कोज्या}^३\text{ क} - ३\ \text{कोज्या क} \qquad (५)$$

$$\begin{aligned}
\text{स्प } ३\text{ क} &= \text{स्प } (२\text{ क} + \text{क}) \\
&= \frac{\text{स्प } २\text{ क} + \text{स्प क}}{१ - \text{स्प } २\text{क स्प क}}
\end{aligned}$$

$$= \frac{\frac{२ \text{ स्प क}}{१ - \text{स्प}^२ \text{ क}} + \text{स्प क}}{१ - \frac{२ \text{ स्प क}}{१ - \text{स्प}^२ \text{ क}} \times \text{स्प क}}$$

$$= \frac{२ \text{ स्प क} + (१ - \text{स्प}^२ \text{ क}) \text{ स्प क}}{१ - \text{स्प}^२ \text{ क} - २ \text{ स्प क. स्प क}}$$

$$\therefore \text{ स्प } ३ \text{ क} = \frac{३ \text{ स्प क} - \text{स्प}^३ \text{ क}}{१ - ३ \text{ स्प}^२ \text{ क}} \qquad ......(६)$$

(४) व (५) या सूत्रांना

$$\text{ज्या } ३ \text{ क} = \text{कोज्या}^३ \text{ क } (३ \text{ स्प क} - \text{स्प}^३ \text{ क})$$

$$\text{कोज्या } ३ \text{ क} = \text{कोज्या}^३ \text{ क } (१ - ३ \text{ स्प}^२ \text{ क})$$

हीं रूपेंहि देतां येतात हें सहज दिसून येईल.

८·२ २ क च्या निष्पत्ती रीतिकीनें काढणें.




आ. ८·१

समजा कस रेषा कग रेषेशीं क हा कोण करते. कग रेषेवर म हा कोणताहि बिंदु केन्द्र घेऊन मक त्रिज्या असलेलें एक वृत्त काढा.

$$= \frac{\frac{२खच}{कच}}{१ - \left(\frac{चग}{चख}\right)\left(\frac{चख}{कच}\right)}$$

$$= \frac{२ \text{ स्प } क}{१ - \text{स्प}^2 \text{ क}}$$

८·३१ उदाहरण १. ज्या ५अ ज्या अ च्या रूपांत व्यक्त करा.

ज्या ५अ

$= \text{ज्या } (३ \text{ अ} + २ \text{ अ})$

$= \text{ज्या } ३ \text{ अ कोज्या } २ \text{ अ} + \text{कोज्या } ३ \text{ अ ज्या } २ \text{ अ}$

$= (३ \text{ ज्या अ} - ४ \text{ ज्या}^3 \text{ अ}) (१ - २ \text{ ज्या}^2 \text{ अ})$
$+ (४ \text{ कोज्या}^3 \text{अ} - ३ \text{ कोज्या अ}). २\text{ज्या अ कोज्या अ}$

$= (३ \text{ ज्या अ} - १० \text{ ज्या}^3 \text{ अ} + ८ \text{ ज्या}^5 \text{ अ})$
$+ २ \text{ ज्या अ कोज्या}^2 \text{ अ } (४ \text{ कोज्या}^2 \text{ अ} - ३)$

$= (३ \text{ ज्या अ} - १० \text{ ज्या}^3 \text{ अ} + ८ \text{ ज्या}^5 \text{ अ})$
$+ २ \text{ ज्या अ } (१ - \text{ज्या}^2 \text{ अ}) (१ - ४ \text{ ज्या}^2 \text{ अ})$

$= (३ \text{ ज्या अ} - १० \text{ ज्या}^3 \text{ अ} + ८ \text{ ज्या}^5 \text{ अ})$
$+ २ \text{ ज्या अ } (१ - ५ \text{ ज्या}^2 \text{ अ} + ४ \text{ ज्या}^4 \text{ अ})$

$= ५ \text{ ज्या अ} - २० \text{ ज्या}^3 \text{ अ} + १६ \text{ ज्या}^5 \text{ अ}$

उदाहरण २. $\frac{१ + \text{ज्या } २ \text{ अ} - \text{कोज्या } २ \text{ अ}}{१ + \text{ज्या } २ \text{ अ} + \text{कोज्या } २ \text{ अ}} = \text{स्प अ}$

हें सिद्ध करा. [कलकत्ता १९३८

वामपक्ष $= \frac{(१ - \text{कोज्या } २ \text{ अ}) + \text{ज्या } २ \text{ अ}}{(१ + \text{कोज्या } २ \text{ अ}) + \text{ज्या } २ \text{ अ}}$

१३५२ आता आपण दशमिकांशाविषयी पुढील प्रमेय सिद्ध करूं.

केवळ दशमिक बिंदूंचीच स्थानें निरनिराळीं असलेल्या व तेच अंक एका ठराविक क्रमांत येऊन बनलेल्या संख्यांच्या छेदांचे दशमिकांश एकच असतात.

समजा क आणि ख या संख्या तेच अंक एका ठराविक क्रमांत येऊन बनलेल्या आहेत पण त्यांच्या दशमिक बिंदूंचीं स्थानें मात्र निरनिराळीं आहेत.

स एखादा धन वा ऋण पूर्णांक असल्यास,

$$ख = क.१०^{स}$$

$$\therefore छे ख = छे (क.१०^{स})$$
$$= छे क + छे १०^{स}$$
$$= छे क + स छे १०$$
$$= छे क + स$$

$$\therefore छे ख - छे क = स$$

यावरून छे क आणि छे ख यांमधील फरक एका अनुकल संख्येइतका आहे, म्हणून त्यांचा दशमिकांश एकच आहे.

पुढील उदाहरणानें हें अधिक स्पष्ट होईल.

समजा छे ४८९२ = ३·६८९५ दिलेली आहे.

$$\therefore \text{छे } ४८९\cdot२ = \text{छे } \frac{४८९२}{१०}$$

$$= \text{छे } ४८९२ - \text{छे } १०$$

$$= ३\cdot६८९५ - १$$

$$= २\cdot६८९५$$

$$\text{छे } ४\cdot८९२ = \text{छे } \frac{४८९२}{१०००}$$

$$= \text{छे } ४८९२ - \text{छे } १०००$$

$$= ३\cdot६८९५ - ३$$

$$= \cdot६८९५$$

$$\text{छे } \cdot००४८९२ = \text{छे } \left(\frac{४८९२}{१०^{६}}\right)$$

$$= \text{छे } ४८९२ - \text{छे } १०^{६}$$

$$= ३\cdot६८९५ - ६$$

$$= \bar{३}\cdot६८९५$$

$$\text{छे } ४८९२०० = \text{छे} (४८९२ \times १००)$$

$$= \text{छे } ४८९२ + \text{छे } १००$$

$$= ३\cdot६८९५ + २$$

$$= ५\cdot६८९५$$

यावरून केवळ ४, ८, ९, २ हेच अंक ४८९२ या क्रमाने येऊन बनलेल्या पण त्यांच्या दशमिक बिंदूचीं स्थानें भिन्न असलेल्या सर्व संख्यांचे छेदा-दशमिकांश एकच असतात हें दिसून येईल. वर दिलेल्या प्रत्येक संख्येच्या छेदेचें लक्षण

मागील अनुच्छेदांत दिलेले नियम लावून तावडतोब मिळवितां येते हें विद्यार्थ्यांनी लक्षांत ठेवावें.

१३·६ छेदांच्या व प्रतिच्छेदांच्या (antilogarithm) सारण्या.

कैंसलच्या छेद-सारणीच्या साह्यानें १ पासून १०००० पर्यंत कोणत्याहि संख्येची छेद काढतां येते. या सारणींत (चार दशमिक स्थानांपर्यंत बरोबर असलेले) केवळ दशमिकांश असतात; पण दशमिक बिंदु लिहिलेला नसतो. १३·५१ या अनुच्छेदांत दिलेल्या नियमांनुसार लक्षण काढून लिहावें लागतें.

१३·६१ उदाहरण. छे ·२३८७ काढा.

निरीक्षणानें छे ·२३८७ चें लक्षण $\bar{1}$ आहे.

∴ छे ·२३८७ = $\bar{1}$ + छे २३८७ चा दशमिकांश.

पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या छेद-सारणीच्या पानावरील पहिल्या स्तंभांतील २३ व पहिल्या ओळींतील ८ या आकड्यांकडे दृष्टि वळवा. २३ च्या समोर व ८ च्या खालीं ३७६६ हा आकडा आहे. २३८७ या दिलेल्या संख्येंतील ७ या चवथ्या अंकाकरता वियोग (difference) स्तंभ पहा. त्यांत ७ च्या खालीं व २३ च्या समोर १३ हा आकडा आहे. हा वियोग ३७६६ मध्ये मिळविल्यानंतर ३७७९ हा आकडा मिळतो. म्हणून इष्ट दशमिकांश ·३७७९ आहे.

∴ छे ·२३८७ = १̄.३७७९.

अभ्यास. (१) छे ·०२८७, (२) छे ६६६६,
(३) छे २५.४२ काढा.

१३·६२ छेदा दिली असतांना तिची संवादी संख्या काढणें हा उलटा प्रश्न अनेकदा उद्भवतो. प्रतिच्छेदासारणीचा उपयोग करून तो सोडवितां येतो.

उदाहरण. २·२८६२ ही छेदा असलेली संख्या काढा.

यांत ·२८६२ हा दशमिकांश आहे. जवळच दिलेल्या प्रतिच्छेदासारणीच्या पानावरील पहिल्या स्तंभांतील ·२८ व पहिल्या ओळींतील ६ या आकड्यांकडे दृष्टि फेका. ·२ च्या समोर व ६ च्या खाली १९३२ हा आकडा आहे. ·२८६२ या दशमिकांशांतील २ या चवथ्या अंकाकरता वियोगस्तंभ पहा. त्यांत ·२८ च्या समोर व २ च्या खाली १ लिहिलेला आहे. हा वियोग १९३२ मध्ये मिळवून आपणांस १९३३ हा आकडा मिळतो.

म्हणून १९३३ या संख्येचा ·२८६२ या दशमिकांशाशीं संबंध प्रस्थापित होतो.

परंतु दिलेलें लक्षण २ आहे. म्हणून इष्ट संख्येंतील दशमिक बिंदु तीन अंकांनंतर आला पाहिजे.

म्हणून १९३·३ ही इष्ट संख्या आहे.

अभ्यास. (१) १̄·१७६२, (२) ·८५०१, (३) ३·४ या छेदा असलेल्या संख्या काढा.

१३·७ त्रिकोणमितीय निष्पत्तींच्या सारण्या.

०° पासून ९०° पर्यंत एक एक कलेने कोण वाढवून मिळणाऱ्या सर्व कोणांच्या ज्या, कोटिज्या व स्पर्शज्या देणाऱ्या सारण्या आहेत. अशा सारण्यांना प्राकृत (natural) ज्या-सारणी, प्राकृत कोटिज्या-सारणी, व प्राकृत स्पर्शज्या-सारणी म्हणतात

कधीकधी आपणांस त्रिकोणमितीय निष्पत्तींनी युक्त असलेल्या व्यंजकाचा अर्हा काढावी लागते.

उदाहरणार्थ, $य = \frac{ज्या २०°३५' \times कोज्या ५४°४०'}{स्प ३३°२४'}$

∴ छेय = छेज्या २०°३५′ + छेकोज्या ५४°४०′ − छेस्प ३३°२४′

छेज्या २०°३५ सारख्या त्रिकोणमितीय निष्पत्तींच्या छेदा काढण्यासाठी आपण प्राकृत ज्या, कोटिज्या वगैरेंच्या सारण्यांवरून प्रथम त्या निष्पत्तींच्या अर्हा काढून नंतर त्या अर्हांच्या छेदा काढू शकतो. पण असे करण्यांत आपणांस दोन निरनिराळ्या सारण्या पहाव्या लागतील. हे दुप्पट श्रम वांचविण्यासाठी ०° ते ९०° पर्यंत सर्व कोणांच्या ज्या, कोटिज्या, स्पर्शज्या यांच्या छेदा काढून त्या वेगळ्या सारण्यांच्या रूपांत मांडल्या आहेत. या सारण्यांना छेदा ज्या-सारणी, छेदा-कोटिज्या सारणी, व छेदा स्पर्शज्या-सारणी म्हणतात.

१३.८ संख्यात्मक गणनांमध्य (calculations) छेदांच्या साह्याने, गुणाकाराचे योगांत व भागाकाराचे वियोगांत सुलभतेने परिवर्तन करता येते. ही छेदांची विशेष उपयुक्तता आहे. तसेंच कोणत्याहि संख्येचे एखाद्या घातास उन्नयन करणें किंवा तिचें मूळ (root) काढणें या क्लिष्ट क्रियांचे छेदांच्या साह्याने केवळ गुणाकार व भागाकार या क्रियांत रूपांतर करता येते. हें खालील उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

उदाहरण१— ८३·२४ च्या ११ व्या मूळाचें ठोकळ मान काढा.

समजा $य = (८३·२४)^{\frac{१}{११}}$

$\therefore$ छे $य = \frac{१}{११}$ छे ८३·२४

छेदासारणीवरून,

छे ८३·२४ = १·९२०३

$\therefore$ छे $य = \frac{१}{११} \times १·९२०३$

= ·१७४६ स्थूल मानाने.

प्रतिच्छेदासारणीवरून,

·१७४६ = छे १·४९५

$\therefore$ छे य = छे १·४९५

किंवा य = १·४९५

उदाहरण २.

$$\sqrt[५]{\frac{(५९)^{७} \times \sqrt[४]{७२}}{(९३)^{३}\ \sqrt[३]{१९}}}$$ चें मान काढा.

समजा य हें इष्ट मान आहे.

$$\text{छे}\,य = \text{छे}\left\{\frac{(५९)^{७}(७२)^{\frac{१}{४}}}{(९३)^{३}(१९)^{\frac{१}{३}}}\right\}^{\frac{१}{५}}$$

$$= \frac{१}{५}\left[\text{छे}(५९)^{७} + \text{छे}(७२)^{\frac{१}{४}} - \text{छे}(९३)^{३} - \text{छे}(१९)^{\frac{१}{३}}\right]$$

$$= \frac{१}{५}\left[७\,\text{छे}\,५९ + \frac{१}{४}\text{छे}\,७२ - ३\,\text{छे}\,९३ - \frac{१}{३}\text{छे}\,१९\right]$$

छेदासारणीने, छे५९ = १·७७०९
छे७२ = १·८५७३
छे९३ = १·९६८५
छे१९ = १·२७८८

$$\therefore \text{छे}\,य = \frac{१}{५}\left[(७ \times १·७७०९) + (\frac{१}{४} \times १·८५७३) - (३ \times १·९६८५) - (\frac{१}{३} \times १·२७८८)\right]$$

$$= \frac{१}{५} \times ६·५२८९$$

= १·३०५८ स्थूलमानाने.

= छे २०·२२ प्रतिच्छेदासारणीने.

$\therefore \quad \text{य} = \text{२०·२२}$

उदाहरण ३. सिद्ध कराः—

$$\text{६ छे}\frac{\text{१०}}{\text{९}} + \text{२ छे}\frac{\text{२४}}{\text{२५}} - \text{छे}\frac{\text{३}}{\text{५}} + \text{३ छे}\frac{\text{८१}}{\text{८०}} = \text{छे २}$$

$$\text{वामपक्ष} = \text{छे}\left(\frac{\text{१०}}{\text{९}}\right)^{\text{६}} + \text{छे}\left(\frac{\text{२४}}{\text{२५}}\right)^{\text{२}} - \text{छे}\left(\frac{\text{३}}{\text{५}}\right) + \text{छे}\left(\frac{\text{८१}}{\text{८०}}\right)^{\text{३}}$$

$$= \text{छे}\left[\frac{\left(\frac{\text{१०}}{\text{९}}\right)^{\text{६}}\left(\frac{\text{२४}}{\text{२५}}\right)^{\text{२}}\left(\frac{\text{८१}}{\text{८०}}\right)^{\text{३}}}{\left(\frac{\text{३}}{\text{५}}\right)}\right]$$

$$= \text{छे}\left\{\left(\frac{\text{५}\times\text{२}}{\text{३}^{\text{२}}}\right)^{\text{६}} \times \left(\frac{\text{३}\times\text{२}^{\text{३}}}{\text{५}^{\text{२}}}\right)^{\text{२}} \times \left(\frac{\text{३}^{\text{४}}}{\text{५}\times\text{२}^{\text{४}}}\right)^{\text{३}} \times \frac{\text{५}}{\text{३}}\right\}$$

$$= \text{छे}\left\{\frac{\text{५}^{\text{७}}.\text{२}^{\text{१२}}.\text{३}^{\text{१४}}}{\text{३}^{\text{१३}}.\text{५}^{\text{७}}.\text{२}^{\text{१२}}}\right\}$$

$$= \text{छे ३} = \text{दक्षिणपक्ष}$$

अन्यथाः—

$$\text{वामपक्ष} = \text{६ छे}\left(\frac{\text{५.२}}{\text{३}^{\text{२}}}\right) + \text{२ छे}\left(\frac{\text{२}^{\text{३}}.\text{३}}{\text{५२}}\right) - \text{छे}\left(\frac{\text{३}}{\text{५}}\right) + \text{३ छे}\left(\frac{\text{३}^{\text{४}}}{\text{२}^{\text{४}}.\text{५}}\right)$$

$$= \text{६ (छे५ + छे२ − २ छे ३)} + \text{२ (३ छे २ + छे ३ − २ छे ५)} - \text{(छे३ − छे५)} + \text{३ (४ छे ३ − ४ छे २ − छे ५)}$$

$$= \text{छे ३} = \text{दक्षिणपक्ष}$$

उदाहरण ४. ३७ चा ७ या आधारावरील छेदा काढा.

१३·२४ या अनुच्छेदानुसार,

$$\text{छे}_{\text{७}}\text{३७} = \text{छे}_{\text{१०}}\text{३७} \times \text{छे}_{\text{७}}\text{१०}$$

$$= \frac{\text{छे}_{\text{१०}}\text{३७}}{\text{छे}_{\text{१०}}\text{७}}$$

$$= \frac{\text{१·५६८२}}{\text{·८४५१}} \quad \text{छेदासारणी वापरून.}$$

$$= \text{१·८५५६}$$

उदाहरण ५. पुढील समीकार ठोकळ मानाने सोडवा.

$$\frac{\text{२}^{\text{३य}}}{\text{११}^{\text{२य+१}}} = \text{१०}^{\text{य−१}}$$

दोन्ही बाजूंच्या छेदा घेऊन,

$$\text{२य छे २} - (\text{२य}+\text{१}) \text{ छे ११} = (\text{य}-\text{१}) \text{ छे१०} = (\text{य}-\text{१})$$

$$\text{य} = \frac{\text{१} - \text{छे ११}}{\text{१} + \text{२छे ११} - \text{३छे२}}$$

$$= \frac{\text{१} - \text{१·०४१४}}{+\text{२·० ८२८} - \text{१·४३१३}}$$

छेदासारणीने.

$$= \frac{-\text{० ०४१४}}{\text{१.६५१५}}$$

$$= -\text{·०२५०७ जवळजवळ}$$

१३·९ अनुपाती भागांचा प्रनियम.

केंसलच्या छेदासारणीच्या साह्याने कोणत्याहि चार अंकी संख्येची छेदा काढतां येते. परंतु जर आपणांस २५६३ व २५६४ या लागोपाठ येणाऱ्या संख्यांमधील एखाद्या संख्येची (उदाहरणार्थ २५६३·६ ची) छेदा काढावयाची असेल तर त्याकरिता

"संख्येच्या छेदेंतील वाढ त्या संख्येंतील वाढीशीं अनुपाती असते"

या अनुपाती भागांच्या प्रनियमाचा (principle) उपयोग करावा लागतो.

पुढील उदाहरणांवरून या प्रनियमाचा उपयोग कसा करतात हें दिसून येईल.

उदाहरण १. छे ७२·३५७ काढा.

प्रथम आपण ७२३५ व ७२६३ यांमध्यें असलेल्या ७२३५·७ या संख्येची छेदा काढूं.

छेदासारणीने, छे ७२३६ = ३·८५९५
छे ७२३५ = ३·८५९४

∴ छे ७२३६ − छे ७२३५ = ·०००१

यावरून, ७२३५ या संख्येंत १ ने वाढ झाली तर तिच्या छेदांत ·०००१ इतकी वाढ होते.

म्हणून अनुपाती भागांच्या प्रनियमाने, संख्या ·७ ने वाढली तर तिची छेदा

·७ × ·०००१ = ·०००७ ने वाढेल.

∴ छे ७२३५७ = ३·८५९४ + ·००००७

= ३·८५९४७

∴ छे ७२·३५७ = १·८५९४७

उदाहरण २. कोज्या ३१°२३′ = ·८५५२ दिली आहे, व १′ करिता फरक = ·००१७ दिला आहे; तर कोज्या ३१°२३′४०″ काढा.

१′ म्हणजे ६०″ करिता फरक = ·००१७

∴ ४०″ करिता फरक = $\frac{४०}{६०}$ × ·००१७

= ·००११ जवळजवळ

आता, जसजसा कोण वाढतो तसतशी कोज्या कमी कमी होते.

∴ कोज्या ३१°२३′४०″ = ·८५५२ − ·००११

= ·८५४१

## उदाहरणसंग्रह १८

(१) छे ७ = ·८४५१ व छे १९ = १·२७८८ दिल्या आहेत;
तर (१) छे १·३३,
(२) छे २४०·१,
(३) छे $\sqrt[५]{१३३}$,
व (४) छे $\sqrt[३]{·००३६१}$
यांच्या अर्हा काढा.

(२) ·०८९, २·०५, ·०००03, $\sqrt[४]{३६९६}$ व $(५२४३७)^{\frac{१}{३}}$
यांच्या छेदांचीं लक्षणें कोणतीं आहेत ?

(३) ०·१७५६ ला ०·०८०२३ ने गुणा व भागा.

(४) (१) $३३·३ \times ·०११२ \times २·०२२$

(२) $\dfrac{८·२५७ \times ११·८३ \times ·५२९२}{३·१४५ \times १·८३२}$

या प्रत्येकाचें मान काढा.

(५) गणन करा (calculate)—

(१) $(·०३६)^{१०}$, $\left(\dfrac{१}{६·०१}\right)^{३५}$, $(·९२)^{००}$

(२) $४६^{२·६}$, $(२·९)^{\frac{१}{२}}$, $(·०००१२२)^{\frac{१}{३}}$

(६) सिद्ध करा—

(१) $७ \text{ छे } \dfrac{१६}{१५} + ५ \text{ छे } \dfrac{२५}{२४} + ३ \text{ छे } \dfrac{८१}{८०} = \text{ छे } २$

[अलाहाबाद १९४०

(२) $७ \text{ छे } \dfrac{१०}{९} - २ \text{ छे } \dfrac{२५}{२४} + ३ \text{ छे } \dfrac{८१}{८०} = \text{ छे } २$

[कलकत्ता १९२३

(७) ढोबळ मान काढा—

(१) $\dfrac{(२३·५)^{२} \times (·५२३)^{३}}{१-(०·३५२)^{२}}$ [मद्रास १९४२

(२) $\sqrt{\dfrac{१७^{\frac{१}{५}} \times ३^{१·६}}{\sqrt{५२} \cdot \sqrt{८९}}}$

(३) $\dfrac{(\text{ज्या } ७०^\circ ३२')^{\frac{१}{५}} \; (\text{स्प } ४०^\circ ५०')^{\frac{३}{२}}}{(\cdot ३२३३)^{\frac{१}{२}} \; \text{कोज्या } ५५^\circ ४'}$

(८) $\text{छे}_{१८}९$, $\text{छे}_{८}\cdot९८$, $\text{छे}_{१७}३३२$ काढा.

(९) जर $\text{छे}_{१०}\text{क} = \text{ख}$ असेल तर $\text{छे}_{१००}\text{क}$ आणि $\text{छे}_{\cdot००१}\text{क}$ काढा. [मुंबई.१९०१

(१०) कोणत्याहि छेदापद्धतीचे
(१) २ या आधारापासून १२८ या आधारावर
(२) ३ या आधारापासून ८१ या आधारावर
(३) ४९ या आधारापासून ७ या आधारावर परिवर्तन करणारा गुणक काढा.

(११) (अ) (१) $२^{७३}$, (२) $३^{४४}$ यातील अंकांची संख्या काढा.

(आ) (१) $२^{-१९}$, (२) $३^{-१३}$ यातलि पहिल्या ठळक (significant) अंकाचें स्थान काढा.

(१२) पुढील समीकार ढोळक मानाने सोडवा.
(१) $७^{२य} - ९(७^{य}) + १४ = ०$ [आंध्र १९३३
(२) $\dfrac{२^{१य}}{३^{य-१}} = ७^{य+१}$
(३) $२^{य-१} = ३^{र+१}$, $२^{य-र} \times ७^{र} = ९$

(१३) छे ९६४१ = ३·२८४१

छे ९६४२ = ३·२८४२

दिल्या आहेत; तर अनुपाती भागांचा प्रनियम वापरुन छे $(\cdot ९६४१८)^{३}$ काढा.

(१४) स्प ५१°६′ = १·२३९३ व स्प ५१°७′ = १·२४०१ दिल्या आहेत; तर अनुपाती भागांच्या प्रनियमाने स्प ५१°६′२५″ काढा.

# प्रकरण चवदावें

## त्रिकोणांचे निर्धारण

१४·१ त्रिकोणाच्या तीन बाजू व तीन कोण यांना त्याचे अवयव (elements) म्हणतात. ज्यांपैकी निदान एक अवयव बाजू आहे असे कोणतेहि तीन अवयव दिले असल्यास त्रिकोण काढतां येतो हें रेखिकीवरून आपणांस माहीत आहे. त्याचप्रमाणे एखाद्या त्रिकोणाचे कोणतेहि तीन अवयव (ज्यांपैकी एक अवयव एक बाजू आहे) दिले असल्यास त्रिकोणमितीने आपणांस बाकीचे अवयव काढतां येतात. या क्रियेस त्रिकोणाचें निर्धारण (solution of the triangle) म्हणतात.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे कखग या त्रिकोणाचे कोण क, ख, ग या अक्षरांनी व त्यांच्या समोरील बाजू अनुक्रमें का, खा, गा या अक्षरांनी दर्शविल्या जातात.

प्रथम आपण लंबकोणत्रिकोणांच्या निर्धारणाचें विवेचन करूं. पुढील दोन अनुच्छेदांत ∠ग लंबकोण घेतला आहे.

१४.२ प्रकार १. दोन बाजू दिल्या असतांना त्रिकोणाचें निर्धारण करणें.

(१) समजा का, खा या बाजू दिल्या आहेत.




आ. १४.१

आता स्प क = $\frac{\text{का}}{\text{खा}}$

∴ छे स्प क = छे का − छे खा

आता का, खा दिलेल्या आहेत. म्हणून छे स्प क आणि त्यापासून क मिळतो.

आणि ख हा कोण ख = ९०° − क या संबंधावरून माहीत होतो.

गा = $\frac{\text{का}}{\text{ज्या क}}$ किंवा $\frac{\text{खा}}{\text{ज्या ख}}$ किंवा $\sqrt{\text{का}^2 + \text{खा}^2}$

यांपैकी कोणत्याहि एका संबंधावरून कर्ण गा काढतां येतो.

गा = $\sqrt{\text{का}^2 + \text{खा}^2}$ हा संबंध छेदांच्या गणनेसाठी सोयीचा नसल्यामुळे गा = $\frac{\text{का}}{\text{ज्या क}}$ किंवा गा = $\frac{\text{खा}}{\text{ज्या ख}}$ हा संबंध वापरणेंच अधिक चांगलें असतें.

(२) समजा कर्ण गा व एक बाजु का हीं दिलीं आहेत. (आकृति १४·१ पहा)

क हा कोण, ज्या क $= \frac{\text{का}}{\text{गा}}$ या समीकारापासून मिळतो.
(हा समीकार आणि या व पुढच्या अनुच्छेदांत येणारे असे सर्व समीकार सारण्यांच्या साह्याने सोडवावेत.)

नंतर ख ($=९०^\circ -$ क) माहीत होतो.
खा ही बाजू,
खा $=$ गा ज्या ख किंवा का कोस्पक किंवा $\sqrt{\text{गा}^2 - \text{का}^2}$,
यांपैकी कोणत्याहि एका संबंधावरून मिळते.

१४·२१. प्रकार २— एक न्यूनकोण व एक बाजू दिली असतांना त्रिकोणाचें निर्धारण करणें.

(१) समजा कोण क व बाजू खा हीं दिलीं आहेत.



आ. १४.२

ख, का आणि गा अनुक्रमें

ख $=९०^\circ -$ क,
का $=$ खा स्प क,
गा $= \frac{\text{खा}}{\text{कोज्या क}}$

या संबंधांवरून निश्चित करतां येतात.

(२) समजा कोण क व कर्ण गा हे दिले आहेत. (आकृति १४·२ पहा.)

ग, का आणि खा अनुक्रमें
ख = ९०° − क,
खा = गा कोज्या क,
का = गा ज्या क,
या समीकारांवरून माहीत होतात.

१४.२२ 'उंची आणि अंतरें' यांवरील प्रश्न सोडवितांना वरील माहिती उपयोगी पडेल.

१४.२३ उदाहरण १. कखग त्रिकोणांत खग या पायाला कच रेषा लंब आहे. ख = ६०°, ग = ४५°, कच = ५ असल्यास खा व गा काढा.




आ. १४·३

कचग त्रिकोणांत,

$$\text{ज्या ग} = \frac{\text{कच}}{\text{कग}}$$

$$\therefore \text{ज्या } ४५^\circ = \frac{५}{\text{खा}}$$

किंवा खा $= ५\sqrt{२}$.

कखच त्रिकोणांत,

$$\text{ज्या ख} = \frac{\text{कच}}{\text{कख}}$$

$$\therefore \text{ज्या } ६०^\circ = \frac{५}{\text{गा}}$$

$$\text{किंवा गा} = \frac{५\cdot२}{\sqrt{३}} = \frac{१० \sqrt{३}}{३}$$

उदाहरण २. कखग त्रिकोणांत क=९०°, खा =४·५, गा = ६·९ असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.




आ १४·४

$$\text{आता स्प ख} = \frac{\text{खा}}{\text{गा}}$$

$$= \frac{४\cdot५}{६\cdot९}$$

$$= \frac{४५}{६९}.$$

∴ छे स्प ख = छे ४५ − छे ६९

= १·६५३२ − १·८३८८ छेदसारणीवरून

= −·१८५६

= $\bar{१}$·८१४४

छेदस्पर्शाच्या सारणीवरून,

छे स्प ३३°७′ = $\bar{१}$·८१४५

∴ ख = ३३°७′ जवळजवळ.

∴ ग = ९०° − ख

= ९०° − ३३°७′

= ५६°५३′

पुन्हा का = $\frac{\text{खा}}{\text{ज्या ख}}$

किंवा का = $\frac{४·५}{\text{ज्या ३३°७′}}$

∴ छे का = छे ४·५ − छे ज्या ३३°७′

= ·६५३२ − $\bar{१}$·७३७५ सारणीवरून

= ·६५३२ + १ − ·७३७५

= ·९१५७

= छे ८·२३५ प्रतिच्छेदसारणीने

∴ का = ८·२३५

## उदाहरणसंग्रह १९

(१) कखग त्रिकोणांत ग हा लंबकोण आहे. का = १२, खा = ३ √२ असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.

(२) कखग त्रिकोणांत क = ९०°, खा = ४०, ग = १५° असल्यास बाजू काढा.

(३) कखग त्रिकोणांत ∠ग = ९०°, खा = ४·३, गा = ८·६ असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.

(४) कखग त्रिकोणांत खग ला कच लंब आहे. खच = ९ पाद, ∠ख = ३०°, ∠ग = ४०° असल्यास कख, कग, कच आणि गच यांच्या लांबी काढा.

१४·३ आतां आपण कोणत्याहि त्रिकोणाच्या निर्धारणाविषयीं विवेचन करूं.

सामान्यतः, ज्यांत एका बाजूचा समावेश होतो असे, त्रिकोणाचे तीन अवयव दिले असल्यास त्रिकोणाचें पूर्णपणें निर्धारण करतां येतें हें आपणांस माहीतच आहे. आतां हे तीन अवयव घेण्याचे पुढील चार प्रकार असूं शकतात.

प्रकार १. तीन बाजू
प्रकार २. दोन बाजू व अंतर्गत (included) कोण
प्रकार ३. एक बाजू व दोन कोण
प्रकार ४. दोन बाजू व त्यांपैकी एकीच्या समोरील कोण

त्रिकोणाचे केवळ तीनच कोण दिलेले असल्यास त्याचें निर्धारण करणें शक्य नसतें. या प्रकाराचा विचार स्वतंत्रपणें १४.८ या अनुच्छेदांत केला आहे.

१४.५ प्रकार १. कखग त्रिकोणाच्या तीन बाजू दिलेल्या आहेत

$$\text{आता}\quad \text{स्प}\frac{\text{क}}{२}=\sqrt{\frac{(\text{सा}-\text{खा})(\text{सा}-\text{गा})}{\text{सा}(\text{सा}-\text{का})}}$$

$$\therefore \text{छे स्प}\frac{\text{क}}{२}=\frac{१}{२}\Big\{\text{छे}(\text{सा}-\text{खा})+\text{छे}(\text{सा}-\text{गा})$$
$$-\text{छेसा}-\text{छे}(\text{सा}-\text{का})\Big\}$$

का, खा, गा बाजू दिल्या आहेत.

म्हणून सा$\left(=\frac{\text{का}+\text{खा}+\text{गा}}{२}\right)$ ही राशि आणि तिच्यावरून (सा − का), (सा − खा), व (सा − गा) या राशी काढतां येतात.

नंतर वरील समीकारावरुन $\frac{\text{क}}{२}$, व म्हणून क, सारण्यांच्या साह्यानें काढतां येतो.

तसेंच, स्प$\frac{\text{ख}}{२}$ च्या सूत्रावरून ख, व नंतर ग = १८०° − क − ख वरून ग काढतां येतो.

ज्या अ = ज्या (१८०° − अ) असल्यामुळे आपल्याला दिलेल्या ज्ये वरून कोणाच्या दोन ऋजुपूरक अर्हा मिळतात. म्हणून निश्चित केलेला कोण संदिग्ध असतो. म्हणून अर्ध-कोणाच्या ज्यार्ची सूत्रें वापरता येत नाहीत उलट

$$\text{कोज्या}\frac{\text{क}}{\text{२}} = \sqrt{\frac{\text{सा (सा − का)}}{\text{खा गा}}}$$

$$\text{व कोज्या}\frac{\text{ख}}{\text{२}} = \sqrt{\frac{\text{सा(सा − खा)}}{\text{गा का}}}$$

ही अर्धकोणाच्या कोटिज्यांची सूत्रें वापरण्यास हरकत नाही.

या सूत्रांवरून $\frac{\text{क}}{\text{२}}$ आणि $\frac{\text{ख}}{\text{२}}$ असंदिग्ध रीतीनें काढता येतात.

परतु यांचा उपयोग करतांना सा, (सा − का), (सा − खा), का, खा, गा या सहा राशींच्या छेदा काढाव्या लागतात, उलट अर्धकोणांच्या स्पर्शज्यार्ची सूत्रें वापरताना सा, (सा − का), (सा − खा) व (सा − गा) या चारच राशींच्या छेदा काढाव्या लागतात

म्हणून, जव्हा सर्व कोण काढण्यासाठी सारण्यार्चे साह्य घेणें आवश्यक असेल तेव्हा स्पर्शज्यान्या सूत्राचा उपयोग करणें सर्वांत चागलें असतें परतु एकच कोण हवा असेल तर ज्या, कोटिज्या, स्पर्शज्या यांपैकीं कोणत्याहि एकीच्या सूत्राचा उपयोग केला तरी चालतो

त्रिकोणाचे केवळ तीनच कोन दिलेले असल्यास, त्याचें निर्धारण करणें शक्य नसतें. या प्रकाराचा विचार स्वतंत्रपणें १४.८ या अनुच्छेदांत केला आहे.

१४.५ प्रकार १. कखग त्रिकोणाच्या तीन बाजू दिलेल्या आहेत.

$$\text{आता}\quad \text{स्प}\frac{\text{क}}{2} = \sqrt{\frac{(\text{सा}-\text{खा})(\text{सा}-\text{गा})}{\text{सा}(\text{सा}-\text{का})}}$$

$$\therefore \text{छेस्प}\frac{\text{क}}{2} = \frac{1}{2}\left\{\text{छे}(\text{सा}-\text{खा}) + \text{छे}(\text{सा}-\text{गा}) - \text{छेसा} - \text{छे}(\text{सा}-\text{का})\right\}$$

का, खा, गा बाजू दिल्या आहेत.

म्हणून सा$\left(=\frac{\text{का}+\text{खा}+\text{गा}}{2}\right)$ ही राशि आणि तिच्यावरून (सा − का), (सा − खा), व (सा − गा) या राशी काढतां येतात.

नंतर वरील समीकारावरुन $\frac{\text{क}}{2}$, व म्हणून क, सारण्यांच्या साह्याने काढतां येतो.

तसेंच, स्प$\frac{\text{ख}}{2}$ च्या सूत्रावरून ख, व नंतर ग = १८०° − क − ख वरून ग काढतां येतो.

ज्या अ = ज्या (१८०° − अ) असल्यामुळे आपल्याला दिलेल्या ज्ये वरून कोणाच्या दोन ऋजुपूरक अर्हा मिळतात. म्हणून निश्चित केलेला कोण संदिग्ध असतो. म्हणून अर्ध-कोणांच्या ज्यांचीं सूत्रें वापरतां येत नाहीत. उलट

$$\text{कोज्या}\frac{\text{क}}{2} = \sqrt{\frac{\text{सा (सा − का)}}{\text{सा गा}}}$$

$$\text{व कोज्या}\frac{\text{ख}}{2} = \sqrt{\frac{\text{सा(सा − खा)}}{\text{गा का}}}$$

ही अर्धकोणांच्या कोटिज्यांचीं सूत्रें वापरण्यास हरकत नाही.

या सूत्रांवरून $\frac{\text{क}}{2}$ आणि $\frac{\text{ख}}{2}$ असंदिग्ध रीतीनें काढतां येतात.

परंतु यांचा उपयोग करतांना सा, (सा − का), (सा − खा), का, खा, गा या सहा राशींच्या छेदा काढाव्या लागतात; उलट अर्धकोणांच्या स्पर्शज्यांचीं सूत्रें वापरतांना सा, (सा − का), (सा − खा) व (सा − गा) या चारच राशींच्या छेदा काढाव्या लागतात.

म्हणून, जव्हां सर्व कोण काढण्यासाठी सारण्यांचें साह्य घेणें आवश्यक असेल तेव्हां स्पर्शज्यांच्या सूत्रांचा उपयोग करणें सर्वांत चांगलें असतें. परंतु एकच कोण हवा असेल तर ज्या, कोटिज्या, स्पर्शज्या यांपैकीं कोणत्याहि एकीच्या सूत्रांचा उपयोग केला तरी चालतो.

पुढील कोटिज्या-नियमावरूनहि कोण काढतां येतात.

$$\text{कोज्या क} = \frac{\text{खा}^2 + \text{गा}^2 - \text{का}^2}{२\ \text{खा}\ \text{गा}},$$

$$\text{कोज्या ख} = \frac{\text{गा}^2 + \text{का}^2 - \text{खा}^2}{२\ \text{गा}\ \text{का}}$$

ही सूत्रें छेदा-गणनाकरितां सोयीस्कर नाहीत. का, खा, गा लहान संख्या असतील तेव्हांच त्यांचा उपयोग करावा.

१४.४१ उदाहरण. का = ४७, खा = ५३, गा = २२ असल्यास सर्व कोण काढा.

$$\text{आता}\quad \text{सा} = \frac{४७ + ५३ + २२}{२} = ६१.$$

सा − का = ६१ − ४७ = १४, सा − खा = ६१ − ५३ = ८ आणि सा − गा = ६१ − २२ = ३९.

$$\therefore\quad \text{स्प}\frac{\text{क}}{२} = \sqrt{\frac{(\text{सा} - \text{खा})\ (\text{सा} - \text{गा})}{\text{सा}\ (\text{सा} - \text{का})}}$$

$$= \sqrt{\frac{८ \times ३९}{६१ \times १४}}$$

$$\therefore\quad \text{छे स्प}\frac{\text{क}}{२} = \frac{१}{२}\ \left\{\text{छे}\ ८ + \text{छे}\ ३९ - \text{छे}\ ६१ - \text{छे}\ १४\right\}$$

$$=\frac{१}{२}\left\{·९०३१+१·५९११-१·७८५३-१·१४६१\right\}$$ छेदासारणीने.

$$=\frac{१}{२}\left(-·४३७२\right)$$

$=-.२१८६$

$=\bar{१}.७८१४$

$=$छे स्प ३१°९' छेदा-स्पर्शांच्या सारणीवरून

$\therefore \quad \frac{क}{२}=३१°९'$ व $क=६२°१८'$

$$पुन्हा\ स्प\ \frac{ख}{२}=\sqrt{\frac{(सा-गा)\ (सा-का)}{सा\ (सा-खा)}}$$

$$=\sqrt{\frac{३९\times १४}{६१\times ८}}$$

$$\therefore\ छे\ स्प\ \frac{ख}{२}=\frac{१}{२}\left\{छे\ ३९+छे १४-छे ६१-छे ८\right\}$$

$$=\frac{१}{२}\left\{१·५९११+१·१४६१-१·७८५३-·९०३१\right\}$$

$$=\frac{१}{२}\ (·०४८८)$$

$=·०२४४$

आता छेदा-स्पर्शज्या सारणीवरून

छे स्प $४६^\circ३६' = \cdot०२४३$,

आणि छे स्प $४६^\circ३७' = \cdot०२४६$

म्हणून छे स्प $४६^\circ३६'$ व छे स्प $४६^\circ३७'$ यांमधे

छे स्प $\frac{ख}{२}$ आहे.

$\therefore ४६^\circ३६'$ व $४६^\circ३७'$ यांमधे $\frac{ख}{२}$ आहे.

समजा $\frac{ख}{२} = ४६^\circ३६'य''$

मग, $य''$ करिता फरक = छे स्प $\frac{ख}{२}$ − छे स्प $४६^\circ३६'$

$= \cdot०२४४ - \cdot०२४३$

$= \cdot०००१$

आणि $६०''$ करिता फरक = छे स्प $४६^\circ३७'$

− छे स्प $४६^\circ३६'$

$= \cdot०२४६ - \cdot०२४३$

$= \cdot०००३$.

$$\therefore \frac{य}{६०} = \frac{\cdot०००१}{\cdot०००३} = \frac{१}{३}$$

$$किंवा\ य = \frac{६०}{३} = २०$$

$$\therefore \quad \frac{\text{ख}}{२} = ४६^\circ३६'२०''$$

$$\therefore \quad \text{ख} = ९३^\circ१२'४०''$$

$$\therefore \quad \text{ग} = १८०^\circ - \text{क} - \text{ख}$$
$$= १८०^\circ - ६२^\circ१८' - ९३^\circ१२'४०''$$
$$= २४^\circ२९'२०''$$

## उदाहरणसंग्रह २०

(१) एका त्रिकोणाच्या बाजू ८, १० व १२ आहेत; तर त्याचा महत्तम कोण लघुत्तम कोणाच्या दुप्पट आहे हें दाखवा.

(२) एका त्रिकोणाच्या बाजू ७५३, ३७५ व ८७२ आहेत; तर त्याचा लघुत्तम कोण काढा.

[मद्रास १८९७

(३) एका त्रिकोणाच्या बाजू २:३:४ या प्रमाणांत आहेत; तर त्रिकोणाचें निर्धारण करा.

(४) एका त्रिकोणाच्या बाजू अनुक्रमें ५७, १५ व ४८ पाद लांब आहेत; तर त्याचा महत्तम कोण १२०° आहे हें सिद्ध करा.

पुढें दिलेल्या अवयवांवरून त्रिकोणाचें निर्धारण करा—

(५) $\text{का} = २२४, \quad \text{खा} = २५६, \quad \text{गा} = २८८.$

(६) $का = \frac{\sqrt{३}+१}{२\sqrt{२}}$, $खा = \frac{\sqrt{३}-१}{२\sqrt{२}}$, $गा = \frac{\sqrt{३}}{२}$

[वनारस १९३५

(७) का = २, खा = $\sqrt{३}+१$, गा = $\sqrt{६}$

(८) का = ३५·१६, खा = ४५·२६, गा = ५६·७८

[आंध्र १९४२

१४·५ प्रकार २. त्रिकोणाच्या दोन बाजू आणि अंतर्गत कोण हीं दिलीं आहेत.

समजा, कखग त्रिकोणाच्या खा व गा या बाजू व त्यांचा अंतर्गत कोण क हे दिले असून खा बाजू गा पेक्षा मोठी आहे.




आ. १४·५

१०·६ या अनुच्छेदानुसार

$$स्प \frac{ख-ग}{२} = \left(\frac{खा-गा}{खा+गा}\right) कोस्प \frac{क}{२}$$

$$\therefore \text{ छेस्प } \frac{\text{ख} - \text{ग}}{२} = \text{छे } (\text{खा} - \text{गा}) - \text{छे } (\text{खा} + \text{गा}) - \text{छेस्प } \frac{\text{क}}{२} \quad \ldots\ldots (१)$$

$$\text{शिवाय } \frac{\text{ख} + \text{ग}}{२} = ९०^{\circ} - \frac{\text{क}}{२} \quad \ldots\ldots\ldots\ldots (२)$$

(१) व (२) या संबंधांवरून $\frac{\text{ख} - \text{ग}}{२}$ व $\frac{\text{ख} + \text{ग}}{२}$ मिळतात व त्यांचा योग आणि वियोग करून ख आणि ग हे कोण काढतां येतात.

$$\text{नंतर } \frac{\text{का}}{\text{ज्या क}} = \frac{\text{खा}}{\text{ज्या ख}}$$

$$\text{किंवा छे का} = \text{छे खा} + \text{छे ज्या क} - \text{छे ज्या ख}$$

यासूत्रावरून का मिळते.

$\text{का}^2 = \text{खा}^2 + \text{गा}^2 - २ \text{ खा गा कोज्या क}$ या संबंधापासूनहि का काढतां येते.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे खा आणि गा लहान संख्या असतील तेव्हाच या सूत्राचा उपयोग करावा.

१४·५१ उदाहरण. एका त्रिकोणाच्या दोन बाजू ७:५ या प्रमाणांत असून त्यांचा अंतर्गत कोन १०२°३६' आहे; तर बाकीचे कोन काढा.

$$\text{समजा } \frac{\text{खा}}{\text{गा}} = \frac{७}{५}$$

म्हणून, पक्षावरून, ख आणि ग बाजूंमधील अंतर्गत कोण क=१०२°३६'

$\therefore$ स्प $\frac{ख-ग}{२}=\left(\frac{७-५}{७+५}\right)$ कोस्प $\left(\frac{१०२°३६'}{२}\right)$

$=\frac{१}{६}$ कोस्प ५१°१८'

$=\frac{१}{६}$ स्प ३८°४२'

$\therefore$ छे स्प $\frac{ख-ग}{२}$=छे स्प ३८°४२'−छे ६

$=\bar{१}$·२०३७−·७७८२ सारणीवरून

$=\bar{१}$·१२५५

आता, सारणीवरून,

छे स्प ७°३६'=$\bar{१}$·१२५२, व छे स्प ७°३७'=$\bar{१}$·१२६२

$\therefore$ ७°३६' व ७°३७' मधे $\left(\frac{ख-ग}{२}\right)$ आहे.

समजा $\frac{ख-ग}{२}$=७°३६' य"

य" करिता फरक=$\bar{१}$·१२५५−$\bar{१}$·१२५२=·०००३

व ६०" करिता फरक=$\bar{१}$·१२६२−$\bar{१}$·१२५२=·००१०

$\therefore$ $\frac{य}{६०}=\frac{·०००३}{·००१०}=\frac{३}{१०}$

$\therefore$ य=१८

$$\therefore\ \frac{ख-ग}{२} = ७^\circ२६'१८'' \qquad \ldots\ldots\ldots(१)$$

$$\text{शिवाय}\ \frac{ख+ग}{२} = ९०^\circ - \frac{क}{२}$$

$$= ९०^\circ - ५१^\circ१८'$$

$$= ३८^\circ४२' \qquad \ldots\ldots\ldots\ldots\ldots(२)$$

(१) आणि (२) यांच्या योगाने आणि वियोगाने,

$ख = ४६^\circ१८'१८''$,

$ग = ३१^\circ५'४२''$

## उदाहरणसंग्रह २१

कखग त्रिकोणात,

(१) $का = २४२$, $खा = १६३$, $\angle ग = ५४^\circ$ असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा. [नागपूर १९४६

(२) $का = ३$, $खा = १$, $ग = ५३^\circ७'४८''$ असल्यास क आणि ख काढा. [नागपूर १९५१

(३) $गा = २१०$, $का = ११०$, $ख = ३४^\circ४२'३०''$ असल्यास ग आणि क काढा. [नागपूर १९३२

(४) का, खा या बाजू १७:११ या प्रमाणांत असून स्प$\frac{ग}{२} = \frac{१६}{१५}$ असल्यास क आणि ख काढा.

(५) $खा = २गा$ व कोण $क = ६०^\circ$ असल्यास ख, ग हे कोण आणि का चें खा शीं असलेलें प्रमाण काढा.

(६) का = ३०, खा = २० व अंतर्गत कोण २२° आहे; तर बाकीचे कोण काढा. [बनारस १९३९

(७) खा = २७, गा = २३, क = ४४°३०′ आहेत; तर ख आणि ग काढा. [बनारस १९४१

(८) खा = १३१, गा = ७२, क = ४०° असल्यास ख आणि ग काढा. [अलाहाबाद १९३८

(९) खा आणि गा यांचे प्रमाण ७:३ असून अंतर्गत कोण क ६०° आहे; तर ख आणि ग काढा. [अलाहाबाद १९४०

(१०) खा = $\sqrt{६}$, गा = $३ - \sqrt{३}$, क = ७५° आहेत; तर त्रिकोणाचे निर्धारण करा.

(सूचना— $का^२ = खा^२ + गा^२ - २ खा गा$ कोज्या क वापरा.)

१४६ प्रकार ३. त्रिकोणाची एक बाजू व दोन कोण हे दिले आहेत.




आ· १४·६

समजा, कखग त्रिकोणाची का ही बाजू आणि ख, ग हे कोण दिलेले आहेत.

ख, ग दिलेले असल्यामुळे क=१८०°−ख−ग या समीकारावरून क माहीत होतो.

$$\text{खा} = \frac{\text{का ज्या ख}}{\text{ज्या क}}$$

किंवा छे खा = छे का + छे ज्या ख − छे ज्या क

तसेच, $\text{गा} = \frac{\text{का ज्या ग}}{\text{ज्या क}}$

किंवा छे गा = छे का + छे ज्या ग − छे ज्या क ∴
या संबंधांवरून खा आणि गा निश्चित होतात.

१४·८१ उदाहरण. कखग त्रिकोणांत, का= ४२७, ख=३०°, ग =७०°२५' असल्यास लघुत्तम बाजू काढा.

आता क= १८०°−ख−ग
= १८०°−३०°−७०°२५'
= ७९°२५'

ख हा लघुत्तम कोण असल्यामुळे ख समोरील खा ही बाजू लघुत्तम असली पाहिजे.

आता $\text{खा} = \frac{\text{का ज्या ख}}{\text{ज्या क}}$

(आ') जर खा = गा असेल तर ख = ग असतो. म्हणून ग अधिककोण होतो, आणि म्हणून त्रिकोण शक्य नसतो.

(इ') जर खा > गा असेल तर ख > ग असतो. म्हणून (१) वरून मिळणारी ग ची केवळ न्यून अर्हाच ग्राह्य असते. म्हणून केवळ एकच त्रिकोण शक्य असतो.

आता आपण वरील सर्व फलांचें संकलन करूं.

(१) जर खा < गा ज्या ख असेल तर एकहि त्रिकोण शक्य नसतो.

(२) जर खा = गा ज्या ख असेल तर एक लंबकोण त्रिकोण असतो.

(३) जर खा > गा ज्या ख आणि < गा असून ख न्यून असेल तर दोन त्रिकोण शक्य असतात.

(४) जर खा > गा किंवा = गा आणि म्हणून अवश्यमेव > गा ज्या ख असुन ख न्यून असेल तर ग न्यून असलेला एक त्रिकोण शक्य असतो.

(५) जर ख अधिककोण असेल तर खा > गा असतांनाच एक त्रिकोण शक्य असतो, नाहीतर एकहि त्रिकोण शक्य नसतो.

खा, गा आणि ख यांच्या कांही विवक्षित अर्हा असल्यास त्रिकोण निश्चित करतांना संदेह किंवा संदिग्धता निर्माण होते; म्हणून या प्रकारास त्रिकोण-निर्धारणाचा संदिग्ध प्रकार म्हणतात.

अर्थात् ज्या ग < १ होते; आणि समीकार (१) वरून ग च्या दोन अर्हा मिळतात. यांपैकी एक अर्हा न्यून व दुसरी अधिक असून या दोन अर्हा एकमेकांना ऋजुपूरक असतात.

परंतु या दोन्ही अर्हा नेहमीच ग्राह्य असतात असें नाही. खालील उपप्रकारांचा आता विचार करूं.

(इ१) जर खा > गा असेल तर ख > ग असतो. पण दिलेला कोण ख न्यून आहे, म्हणून ग सुद्धा न्यून कोण असला पाहिजे. ख > ग असल्याने, ग आधिककोण असल्यास ख सुद्धा अधिककोण होईल. म्हणून ग ची अधिक अर्हा ग्राह्य नाही. या प्रकारांत ग ची एकच अर्हा असते.

(इ२) जर खा = गा असेल तर ख = ग असतो. म्हणून या प्रकारांत सुद्धा ग ची एकच अर्हा असूं शकते व ती न्यून असते.

(इ३) जर खा < गा असेल तर ख < ग असतो. या प्रकारांत ग च्या दोन्ही अर्हा ग्राह्य आहेत. ग च्या दोन अर्हां-वरून क च्याहि दोन अर्हा मिळतात. नंतर समीकार (२) वरून का च्या दोन अर्हा मिळतात. म्हणून या प्रकारांत दिलेले प्रतिबंध (conditions) पाळणारे दोन त्रिकोण असतात.

आता ख हा अधिककोण आहे असें समजा.

(अ') जर खा < गा असेल तर ख < ग असतो. म्हणून ग अधिककोण होतो. या प्रकारांत त्रिकोण शक्य नसतो.

(आ') जर खा = गा असेल तर ख = ग असतो. म्हणून ग अधिककोण होतो, आणि म्हणून त्रिकोण शक्य नसतो.

(इ') जर खा > गा असेल तर ख > ग असतो. म्हणून (१) वरून मिळणारी ग ची केवळ न्यून अर्थाच ग्राह्य असते. म्हणून केवळ एकच त्रिकोण शक्य असतो.

आता आपण वरील सर्व फलांचे संकलन करूं.

(१) जर खा < गा ज्या ख असेल तर एकहि त्रिकोण शक्य नसतो.

(२) जर खा = गा ज्या ख असेल तर एक लंबकोण त्रिकोण असतो.

(३) जर खा > गा ज्या ख आणि < गा असून ख न्यून असेल तर दोन त्रिकोण शक्य असतात.

(४) जर खा > गा किंवा = गा आणि म्हणून अवश्यमेव > गा ज्या ख असून ख न्यून असेल तर ग न्यून असलेला एक त्रिकोण शक्य असतो.

(५) जर ख अधिककोण असेल तर खा > गा असतांनाच एक त्रिकोण शक्य असतो, नाहीतर एकहि त्रिकोण शक्य नसतो.

खा, गा आणि ख यांच्या कांही विवक्षित अर्थी असल्यास त्रिकोण निश्चित करतांना संदेह किंवा संदिग्धता निर्माण होते; म्हणून या प्रकारास त्रिकोण-निर्धारणाचा संदिग्ध प्रकार म्हणतात.



आकृति १



आकृति २



आकृति ३



आकृति ४

आ. १४·८

खा, गा, ख या दिलेल्या अवयवांवरून त्रिकोण काढण्याचा प्रयत्न करा. कख = गा घेऊन, ख या दिलेल्या कोणाएवढा कखच कोण काढा. ग हा तिसरा बिंदु खच वर असून क पासून खा इतक्या अंतरावर आहे म्हणून क हें केन्द्र आणि खा ही त्रिज्या घेऊन वृत्त काढा.

खच ला कच लंब काढा.

∴ कच = गा ज्या ख

आता पुढील प्रकार उद्भवतात.

(१) खा < गा ज्या ख अर्थात् < कच असेल तर काढलेलें वृत्त खच ला मुळीच छेदीत नाही. म्हणून एकहि त्रिकोण काढतां येत नाही. (आकृति १)

(२) खा = गा ज्या ख अर्थात् = कच असेल तर काढलेलें वृत्त खच ला च बिंदूंत स्पर्श करतें. म्हणून कखच किंवा कखग हा ग शीं लंबकोण असलेला एकच त्रिकोण तयार होतो. (आकृति २)

(३) खा > गा ज्या ख अर्थात् > कच, पण < गा असेल तर काढलेलें वृत्त खच ला ख च्या एकाच बाजूस असलेल्या ग$_1$ आणि ग$_2$ या दोन बिंदूंत छेदतें. म्हणून दिलेले अवयव असणारे कखग$_1$ व कखग$_2$ हे दोन त्रिकोण तयार होतात.

(आकृति ३)

(४) खा > गा म्हणून अवश्यमेव > गा ज्या ख अर्थात् > कच असेल तर काढलेलें वृत्त खच ला ख च्या विरुद्ध बाजूस असलेल्या ग$_1$ आणि ग$_2$ या दोन बिंदूंत छेदतें. आकृतींतील कखग$_2$ या त्रिकोणांतील कखग$_2$ हा कोण १८०° − ख एवढा आहे आणि म्हणून △कखग$_2$ दिलेले प्रतिबंध पाळीत नाही. म्हणून दिलेले अवयव असलेला कखग$_1$ हाच तेवढा त्रिकोण आहे.

खा = गा असल्यास ख आणि ग$_2$ हे बिंदू संपाती होतात आणि एकच त्रिकोण तयार होतो. (आकृति ४)

ख अधिककोण असतांना योग्य त्या आकृत्या काढल्यास असें दिसून येईल की $\text{खा} < \text{गा}$ किंवा $\text{खा} = \text{गा}$ असते तेव्हा त्रिकोण शक्य नसतो, परंतु $\text{खा} > \text{गा}$ असते तेव्हा केवळ एकच त्रिकोण तयार होतो.

**१४.७२ संदिग्ध प्रकाराचा बैजिकीदृष्ट्या विचार.**

अनुच्छेद १४ ७ च्या आकृतीवरून,

$$\text{खा}^2 = \text{गा}^2 + \text{का}^2 - 2\ \text{गा}\ \text{का}\ \text{कोज्या}\ \text{ख}$$

खा, गा, ख दिले आहेत, तर का काढणें.

वरील संबंध का चा वर्गसमीकार समजून पुढीलप्रमाणे लिहिता येतो.

$$\text{का}^2 - 2\ \text{गा}\ \text{कोज्या}\ \text{ख}.\ \text{का} + (\text{गा}^2 - \text{खा}^2) = 0$$

$$\therefore \quad \text{का} = \frac{2\text{गा}\ \text{कोज्या}\ \text{ख} \pm \sqrt{4\text{गा}^2\ \text{कोज्या}^2\ \text{ख} - 4(\text{गा}^2 - \text{खा}^2)}}{2}$$

$$\text{किंवा}, \text{का} = \text{गा}\ \text{कोज्या}\ \text{ख} \pm \sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\ \text{ज्या}^2\ \text{ख}} \qquad \ldots\ldots\ldots (\text{अ})$$

(१) $\text{खा} < \text{गा}\ \text{ज्या}\ \text{ख}$ असल्यास $\sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\ \text{ज्या}^2\ \text{ख}}$ ही काल्पनिक (imaginary) राशि असते आणि (अ) वरून का ची एकहि वास्तविक अर्हा मिळत नाही. म्हणून कलम त्रिकोण शक्य नसतो.

(२) $\text{खा} = \text{गा}\ \text{ज्या}\ \text{ख}$ असल्यास समीकाराचीं दोन मूळें वास्तविक आणि समान असतात, आणि का, गा कोज्या ख

समान होते. म्हणून केवळ एकच लंबकोण त्रिकोण निर्माण होतो.

(३) खा > गा ज्या ख असल्यास का च्या दोन वास्तविक आणि भिन्न अर्हा असतात. का ही बाजू नेहमीच धन असल्यामुळे त्या दोन्हीहि अर्हा जेव्हा धन असतात तेव्हाच त्या ग्राह्य मानल्या जातात.

आता का च्या दोन अर्हांपैकी

गा कोज्या ख + $\sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\text{ज्या}^2\text{ख}}$ ही धन आहे.

आणि गा कोज्या ख − $\sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\text{ ज्या}^2\text{ ख}}$ धन होईल, पण त्यासाठी

$$\sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\text{ ज्या}^2\text{ ख}} < \text{गा कोज्या ख}$$

किंवा $\text{खा}^2 - \text{गा}^2\text{ ज्या}^2\text{ ख} < \text{गा}^2\text{ कोज्या}^2\text{ ख}$

किंवा $\text{खा}^2 < \text{गा}^2\ (\text{कोज्या}^2\text{ ख} + \text{ज्या}^2\text{ ख})$

किंवा $\text{खा}^2 < \text{गा}^2$

किंवा खा < गा

असावयास पाहिजे.

म्हणून खा > गा ज्या ख आणि < गा असते तेव्हाच दोन त्रिकोण निर्माण होतात.

(४) खा > गा असल्यास

गा कोज्या ख − $\sqrt{\text{खा}^2 - \text{गा}^2\text{ ज्या}^2\text{ ख}}$

ही का ची अर्हा ऋण होते आणि म्हणून तत्संबद्ध त्रिकोण

शक्य नसतो. या प्रकारांत का च्या घन अर्हेनुसार केवळ एकच त्रिकोण शक्य असतो.

खा = गा असल्यास का ची एक अर्हा शून्य असते आणि तत्संबद्ध त्रिकोण शक्य नसतो. या प्रकारांत २ गा कोज्या ख ही का ची दुसरी अर्हा असणारा केवळ एकच त्रिकोण शक्य असतो.

(५) ख अधिककोण असल्यास गा कोज्या ख ऋण असते, आणि गा कोज्या ख $-\sqrt{\text{खा}^2-\text{गा}^2\text{ज्या}^2\text{ख}}$ ही का ची अर्हा नेहमी ऋण असते व तत्संबद्ध त्रिकोण शक्य नसतो.

आता, जर

$$\text{गा कोज्या ख} + \sqrt{\text{खा}^2-\text{गा}^2\text{ज्या}^2\text{ख}} > 0$$

किंवा $\sqrt{\text{खा}^2-\text{गा}^2\text{ज्या}^2\text{ख}} > -\text{गा कोज्या ख}$

किंवा $\text{खा}^2 > \text{गा}^2\text{कोज्या}^2\text{ख} + \text{गा}^2\text{ज्या}^2\text{ख}$

किंवा खा > गा

असेल तर का ची दुसरी अर्हा घन होते.

म्हणून ख अधिककोण असतांना, खा < गा किंवा खा = गा असल्यास त्रिकोण शक्य नसतो. परंतु खा > गा असेल तर केवळ एकच त्रिकोण शक्य असतो.

१४·७४ उदाहरण १. कखग त्रिकोणांत खा = ४१, गा = ६० व ख = २८°३०′ दिले आहेत. तर त्याचें निर्धारण संदिग्ध आहे हें सिद्ध करा आणि बाकीचे कोण काढा.

आता दिलेला कोण ख न्यून आहे. म्हणून निर्धारण संदिग्ध असण्याकरिता

$$\text{खा} > \text{गा ज्या ख व} < \text{गा}$$

अर्थात् ४१ > ६० ज्या २८°३०′ व < ६०
असावयास पाहिजे.

आता, प्राकृत ज्या-सारणीत, ज्या २८°३०′ = ·४७७२

∴ ४१ > ६० × ·४७७२ व < ६०

किंवा ४१ > २८·६३२ व < ६०
असेल तर त्रिकोणाविषयी संदिग्धता राहील.

परंतु हे सत्य आहे. म्हणून प्रकार संदिग्ध आहे.

$$\text{ज्या ग} = \frac{\text{गा ज्या ख}}{\text{खा}}$$

$$= \frac{\text{६० × ज्या २८°३०′}}{\text{४१}}$$

छे ज्या ग = छे ६० + छे ज्या २८°३०′ − छे ४१

$= \text{१·७७८२} + \bar{\text{१}}\text{·६७८७} − \text{१·६१२८}$

$= \bar{\text{१}}\text{·८४४१}$

= छे ज्या ४४°१८′

∴ ग = ४४°१८′ किंवा १८०° − ४४°१८′
म्हणून, १४·७२ या अनुच्छेदाच्या आकृति ३ वरून,

$ग_1 = ४४°१८'$

$ग_2 = १३५°४२'$

ग च्या दोन अर्हांनुसार, क च्या

$क_1 = \angle खकग_1 = १८०° - २८°३०' - ४४°१८' = १०७°१२'$

आणि

$क_2 = \angle खकग_2 = १८०° - २८°३०' - १३५°४२' = १५°४८'$ या दोन अर्हा मिळतात.

उदाहरण २. खा, गा, ख दिलेले असून संदिग्ध प्रकारांत $का_1$, $का_2$ या तिसऱ्या बाजूच्या अर्हा असतील तर

(१) $का_1 + का_2 = २गा \text{ कोज्या } ख$

(२) $\text{कोज्या } \frac{क_1 - क_2}{२} = \frac{गा}{खा} \text{ ज्या } ख$

[अलाहाबाद १९३१

हें सिद्ध करा.

आता, $\text{कोज्या } ख = \frac{गा^2 + का^2 - खा^2}{२ गा का}$ या सूत्रावरून

$का^2 - २ \text{ गा कोज्या } ख \times का + (गा^2 - खा^2) = ०$

या समीकाराचीं $का_1$ व $का_2$ हीं मूळें आहेत; म्हणून वर्गसमीकाराच्या सिद्धांतानुसार (theory),

$का_1 + का_2 = २गा \text{ कोज्या } ख$ ... ............(१)




आ. १४.९

आता,

$\text{क}_1 + \text{ख} + \text{ग}_1 = १८०^\circ$

आणि

$\text{क}_2 + \text{ख} + \text{ग}_2 = १८०^\circ$

∴ या दोन समीकारांचा योग करून,

$$(\text{क}_1 + \text{क}_2) + २\text{ख} + (\text{ग}_1 + \text{ग}_2) = ३६०^\circ$$

पण $\text{ग}_1, \text{ग}_2$ ऋजुपूरक कोण असल्यामुळे $\text{ग}_1 + \text{ग}_2 = १८०^\circ$

$$\therefore \quad \text{क}_1 + \text{क}_2 = १८०^\circ - २\text{ख}$$

किंवा $\dfrac{\text{क}_1 + \text{क}_2}{२} = ९०^\circ - \text{ख}$ ......(अ)

$\text{कखग}_1$ त्रिकोणांत, $\dfrac{\text{खा}}{\text{ज्या ख}} = \dfrac{\text{का}_1}{\text{ज्या क}_1}$

$\text{कखग}_2$ त्रिकोणांत, $\dfrac{\text{खा}}{\text{ज्या ख}} = \dfrac{\text{का}_2}{\text{ज्या क}_2}$

$$\therefore \frac{\text{खा}}{\text{ज्या ख}} = \frac{\text{का}_1}{\text{ज्या क}_1} = \frac{\text{का}_2}{\text{ज्या क}_2} = \frac{\text{का}_1 + \text{का}_2}{\text{ज्या क}_1 + \text{ज्या क}_2}$$

$$= \frac{२\,\text{गा कोज्या ख}}{२\,\text{ज्या}\dfrac{\text{क}_1 + \text{क}_2}{२}\,\text{कोज्या}\dfrac{\text{क}_1 - \text{क}_2}{२}}$$

(१) वरून

$$= \frac{\text{गा कोज्या ख}}{\text{ज्या } (९०^\circ - \text{ख}) \text{ कोज्या } \frac{\text{क}_१ - \text{क}_२}{२}},$$

(अ) वरून

$$= \frac{\text{गा कोज्या ख}}{\text{कोज्या ख कोज्या } \frac{\text{क}_१ - \text{क}_२}{२}}$$

$$= \frac{\text{गा}}{\text{कोज्या } \frac{\text{क}_१ - \text{क}_१}{२}}$$

$$\therefore \text{कोज्या } \frac{\text{क}_१ - \text{क}_२}{२} = \frac{\text{गा ज्या ख}}{\text{खा}}$$

## उदाहरणसंग्रह २३

(१) पुढील अवयव दिले आहेत:—

(१) खा = २५, गा = १६, ख = ११५°६'

(२) खा = २२, गा = ३३, ख = ३०°४२'

(३) खा = ७, गा = ७, ख = १२०°

(४) खा = ४ √२, गा = ८, ख = ४५°

यांतून, ज्यांत (अ) एक त्रिकोण असतो, किंवा (आ) दोन त्रिकोण असतात, किंवा (इ) एकहि त्रिकोण नसतो असे प्रकार वेचून काढा. शिवाय शक्य असेल तेव्हा त्रिकोणाचें निर्धारण करा.

(२) गा = ४७·२३, का = ५६·५५, ग = ४८°२७′ दिले आहेत. तर कलग त्रिकोण संदिग्ध आहे हें सिद्ध करा आणि सारण्यांच्या साहाने त्याचें निर्धारण करा.

[नागपूर १९४२

(३) खालीलपैकी संदिग्ध प्रकार वेचून काढा व त्याबद्दल कारणें द्या आणि तत्संबद्ध त्रिकोणाचें निर्धारण करा.
(१) क = ३०°, गा = २५० पाद, का = १२५ पाद
(२) क = ३०°, गा = २५० पाद, का = २०० पाद

[पाटणा १९४२

(४) एका त्रिकोणाचा एक कोण ११२°४′ असून त्यासमोरील बाजू ५७३ पाद आहे आणि दुसरी एक बाजू ३२४ पाद आहे. तर बाकीचे कोण काढा.

[अलाहाबाद १९३९

(५) खा = २, गा = √३ + १, क = ४५° असल्यास कखग त्रिकोणाचें निर्धारण करा.

[मैसूर १९४३

(६) का = ३६०, खा = २८५, क = ३४° असल्यास कखग त्रिकोणाचें निर्धारण करा.

[त्रावणकोर १९४३

(७) कखग त्रिकोणाच्या संदिग्ध प्रकारांत खा, गा आणि ख दिले असल्यास का च्या दोन अर्हांमधील फरक २√खा² − गा²ज्या²ख आहे हें सिद्ध करा.

(८) कखग त्रिकोणांत खा, गा, ख दिले असतांना, त्याच्या संदिग्ध प्रकारांत $का_1$, $का_2$ या तिरऱ्या बाजूच्या अर्हा असून $का_1 > का_2$ असल्यास सिद्ध करा की

(१) $का_1 - का_2 = २$ खा कोज्या ग [बनारस १९२८

(२) $(का_1 - का_2)^2 + (का_1 + का_2)^2 स्प^2 ख = ४खा^2$

(३) $का_1^2 + का_2^2 - २ का_1 का_2$ कोज्या२ख

$= ४खा^2$कोज्या$^2$ख

[बनारस १९३५

१४·८ आता आपण १४·३ अनुच्छेदाच्या शेवटीं उल्लेखिलेल्या तीन कोणांच्या प्रकाराविषयीं विचार करूं.

केवळ क, ख, ग हे त्रिकोणाचे तीन कोण दिलेले असतात, तेव्हा $\frac{का}{ज्या क} = \frac{खा}{ज्या ख} = \frac{गा}{ज्या ग}$ या सूत्रावरून त्याच्या बाजूंचें परस्परांत असलेलें प्रमाण काढतां येतें, पण बाजूंच्या प्रत्यक्ष लांबी काढतां येत नसल्यामुळे त्रिकोणाचें निर्धारण करतां येत नाहीं. अशा प्रकारांत, दिलेले तीन कोण असणारे त्रिकोण असंख्य असून ते सर्व समरूप असतात.

१४·९ इतर न्यासावरून (data) त्रिकोणांचें निर्धारण.

त्रिकोणाच्या बाजू आणि कोण यांच्याऐवजी इतर न्यास दिलेला असल्यास कधीकधी त्याचें निर्धारण करतां येतें. खालील उदाहरणांवरून अशा वेळीं उपयोगांत आणलेली निर्धारणाची रीत दिसून येईल.

उदाहरण १. गा, का+खा, आणि ग दिले असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.

$$\text{आता } \frac{\text{का}+\text{खा}}{\text{गा}} = \frac{\text{ज्या क}+\text{ज्या ख}}{\text{ज्या ग}}$$

$$= \frac{२\text{ज्या}\frac{\text{क}+\text{ख}}{२}\text{कोज्या}\frac{\text{क}-\text{ख}}{२}}{\text{ज्या ग}}$$

$$= \frac{२\text{कोज्या}\frac{\text{ग}}{२}\text{कोज्या}\frac{\text{क}-\text{ख}}{२}}{२\text{ज्या}\frac{\text{ग}}{२}\text{कोज्या}\frac{\text{ग}}{२}}$$

$$= \frac{\text{कोज्या}\frac{\text{क}-\text{ख}}{२}}{\text{ज्या}\frac{\text{ग}}{२}}$$

$$\therefore \text{कोज्या}\frac{\text{क}-\text{ख}}{२} = \frac{\text{का}+\text{खा}}{\text{गा}}\text{ज्या}\frac{\text{ग}}{२}$$

या संबंधावरून $\frac{\text{क}-\text{ख}}{२}$ माहीत होतो.

आणि $\frac{\text{क}+\text{ख}}{२} = ९०^\circ - \frac{\text{ग}}{२}$ वरून $\frac{\text{क}+\text{ख}}{२}$ माहीत होतो.

म्हणून क आणि ख हे कोन काढतां येतात.

आता क आणि ख हे कोन माहीत झाले आहेत आणि बाजू गा दिलेली आहे. म्हणून या उदाहरणाला प्रकार ३ चें रूप येतें

उदाहरण २. शिरोबिंदूंपासून समोरील बाजूंवर काढलेले लंब दिले आहेत, तर त्रिकोणाचें निर्धारण करा.

क, ख, ग या शिरोबिंदूंपासून समोरील बाजूंवर काढलेल्या लंबांच्या लांबी अनुक्रमें ल$_1$, ल$_2$, ल$_3$ आहेत असें समजा.

$\therefore$ का ल$_1$ = खा ल$_2$ = गा ल$_3$ = २$\Delta$

$$\therefore \frac{\text{का}}{\frac{१}{\text{ल}_1}} = \frac{\text{खा}}{\frac{१}{\text{ल}_2}} = \frac{\text{गा}}{\frac{१}{\text{ल}_3}}$$

तीन बाजूंचें प्रमाण माहीत होतांच हें उदाहरण प्रकार १ च्या रूपांत येतें आणि तो प्रकार निर्धारण्याची रीत येथे लागू पडते.

## उदाहरणसंग्रह २४

(१) एका त्रिकोणाचे कोण समांतर श्रेढींत असून त्याचा लघुत्तम कोण ३०° चा आहे. तर त्याची महत्तम बाजू लघुत्तम बाजूच्या दुप्पट आहे हें दाखवा.

(२) एका त्रिकोणाचे कोण १:५:६ या प्रमाणांत असल्यास त्याच्या बाजू $\sqrt{३}-१ : \sqrt{३}+१ : २\sqrt{२}$ या प्रमाणांत आहेत हें सिद्ध करा.

(३) कखग त्रिकोणांत कोज्या क = $\frac{\sqrt{३}}{२}$ व कोज्या ग = $\frac{\sqrt{५}}{३}$ असल्यास का : खा : गा हें प्रमाण काढा.

(४) एका त्रिकोणाचे कोण समांतर श्रेढींत आहेत आणि त्याच्या महत्तम व लघुत्तम बाजूंच्या लांबी अनुक्रमें २४ व १६ आहेत. तर त्रिकोणाचें निर्धारण करा.
[पाटणा १९३९

(५) एका त्रिकोणाच्या दोन बाजू ६५ व २५ आहेत आणि त्यांच्या समोरच्या कोणांमधील फरक ६०° आहे. तर सर्व कोण काढा. [अलाहाबाद १९४२

कखग त्रिकोणांत,

(६) (का + खा + गा) (खा + गा − का) = खागा असेल तर क काढा.

(७) ग = ६०°, का − खा = १, काखा = २० असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.

(८) का = ३२पाद, खा + गा = १०६पाद व ∠ग = १३२°३४′ असल्यास त्रिकोणाचें निर्धारण करा.
[नागपूर १९४४

$$\left[\text{सूचना — } \frac{\text{खा}+\text{गा}-\text{का}}{\text{खा}+\text{गा}+\text{का}} = \text{स्प}\frac{\text{ख}}{2}\text{स्प}\frac{\text{ग}}{2} \text{ वापरा.}\right]$$

(९) का = ८७ पाद, गा − खा = १९ पाद, ∠ख = ५७ दिले असल्यास कोण क व बाजू खा काढा.
[नागपूर १९४०

$$\left[\text{सूचना — } (\text{का}-\text{खा}+\text{गा})\,\text{स्प}\frac{\text{ख}}{2} = (\text{का}+\text{खा}-\text{गा})\,\text{स्प}\frac{\text{ग}}{2} \text{ वापरा.}\right]$$

(१०) क = ६२°, ख = ४३° असून त्रिकोणाचे क्षेत्रफळ ५३० वर्ग एककें (units) आहे. तर त्रिकोणाच्या बाजू काढा. [नागपूर १९४५

[सूचना — $\Delta = \frac{१}{२}$ का² ज्या ख ज्या ग व्युज्ज्या क वापरा.]

# प्रकरण पंधरावें

## उंची आणि अंतरें

१५·१ परिभाषा — म आणि ब हे दोन बिंदू असून




आ. १५·१

ब म पेक्षा उच्च पातळीवर (level) आहे. म तून काढलेली क्षैतिज (horizontal) रेषा ब मधून काढलेल्या उदग्र (vertical) रेषेस य बिंदूंत मिळते. बभ मय ला समांतर काढली आहे. म शीं डोळा ठेवून ब कडे पाहिलें असतां होणाऱ्या यमब कोणाला ब चा म शीं झालेला उन्नतिकोण (angle of elevation) म्हणतात, आणि ब शीं डोळा ठेवून बम दिशेने पाहिले असतां होणाऱ्या भबम कोणाला म चा ब शीं झालेला अवनतिकोण (angle of depression) म्हणतात.

१५·२ बिंदु किंवा इतर वस्तूंमधील (objects) अंतरें किंवा मनोरे, स्तूप इत्यादींच्या उंची, त्याच्याविषयी अवनति, उन्नति किंवा इतर आवश्यक कोण दिले असल्यास त्रिकोणमितीच्या साह्यानें काढता येतात. अवनति किंवा उन्नति कोणासारखे आवश्यक कोण मोजण्यासाठी षट्क (sextant) आणि त्रिकोणमान (theodolite) या यंत्राचा उपयोग करतात.

१५·३ आता आपण वस्तूंच्या उंची आणि त्यामधील अंतरें यासंबंधी काही उदाहरणें सोडवू.

उदाहरण १. एका क्षैतिज समतलावर एक खांब उभा आहे त्याच्या पायथ्यापासून ३२ यष्टी अंतरावर असलेल्या बिंदूशीं त्याच्या शिखराचा उन्नतिकोण १५° आहे असें आढळून येतें. तर त्या खांबाची उंची काढा.




आ १५२

समजा मक हा खांब असून त्याची उंची उ यष्टी आहे. क्षैतिज समतलावर खांबाच्या म या पायथ्यापासून ३२ यष्टी अंतरावर ख बिंदु आहे

कख जोडा. मग मकख त्रिकोणांत,

$\angle$मखक $=$ १५°

आणि $\frac{\text{उ}}{\text{३२}}$ $=$ स्प १५°

$$= \frac{\sqrt{३} - १}{\sqrt{३} + १}$$

$$= २ - \sqrt{३}$$

$\therefore$ उ = $(२ - \sqrt{३})$ ३३ यष्टी.

उदाहरण २. एका विवक्षित जागीं एका टेकडीच्या माथ्याच्या उन्नतिकोणाची कोटिस्पर्शज्या $\frac{७}{९}$ आहे. टेकडीकडे सरळ ७२ पाद चालून गेल्यावर त्याच्या उन्नतिकोणाची कोटिस्पर्शज्या $\frac{१}{३}$ होते. तर टेकडीची उंची काढा.



आ. १५·३

समजा मग ही टेकडी असून तिची उंची उ पाद आहे. क्षैतिज समतलावर क बिंदूशी ग या माथ्याचा उन्नतिकोण अ आहे.

$\therefore$ कोस्प अ = $\frac{७}{९}$

कम दिशेने कख हें ७२ पाद अंतर चालून गेल्यावर ख शीं आ उन्नतिकोण होतो.

$\therefore$ कोस्प आ $= \frac{१}{२}$

कमग त्रिकोणांत,

$\frac{७}{९}$ = कोस्प अ = $\frac{\text{कम}}{\text{उ}}$

$\therefore$ कम = $\frac{७\text{उ}}{९}$

खमग त्रिकोणांत,

$\frac{१}{२}$ = कोस्प आ = $\frac{\text{खम}}{\text{उ}}$

$\therefore$ खम = $\frac{\text{उ}}{२}$

आता कख = कम − खम

पण कख = ७२ पाद

$\therefore$ ७२ = $\frac{७\text{उ}}{९} - \frac{\text{उ}}{२}$

= $\frac{४\text{उ}}{९}$

किंवा उ = १८ × ९

= १६२ पाद.

उदाहरण ३. एका सुळक्याचें शिखर समुद्रपातळीपासून ३०० पाद उंचीवर आहे. शिखरावरील निरीक्षकास समुद्रांत नांगरलेल्या दोन जहाजांचे अवनतिकोण अनुक्रमें ३०° व ६०° आहेत असें आढळून येतें. त्यांना जोडणारी रेषा सुळक्याच्या तळाशीं मिळत असल्यास जहाजांमधील अंतर काढा.




समजा, मग हा सुळका असून म त्याचें तळ आणि ग शिखर आहे. क आणि ख हीं जहाजें असून क, ख, म एकाच सरळ रेषेंत आहेत. गभ मकलासमांतर काढा.

आ. १५-४

पक्षावरून (data),

$\angle$ भगक = ३०°

$\angle$ भगख = ६०°

आणि मग = ३०० पाद.

$\therefore$ $\angle$ गकक = ३०°

व $\angle$ गखम = ६०°

समजा इष्ट अंतर कख = य पाद.

∴मग या लंबकोणत्रिकोणांत,

$$\frac{\text{मग}}{\text{कग}} = \text{ज्या}३०°$$

किंवा $\frac{३००}{कग} = \frac{१}{२}$

$$\therefore कग = ६०० \text{ पाद.}$$

कखग त्रिकोणांत,

$$\frac{कख}{ज्या\, कगख} = \frac{कग}{ज्या\, कखग}$$

$$\therefore \frac{य}{ज्या\, ३०^\circ} = \frac{६००}{ज्या(१८० - ६०^\circ)}$$

$$\text{किंवा } य = \frac{६०० \times \frac{१}{२}}{\frac{\sqrt{३}}{२}} \text{ पाद}$$

$$= \frac{६००}{\sqrt{३}} \text{ पाद}$$

$$= २०० \sqrt{३} \text{ पाद}$$

उदाहरण ४. एका बुरुजाचा उन्नतिकोण त्याच्या दक्षिणे-कडील क या एका बिंदूशी ६०° आणि क च्या पश्चिमेस असलेल्या ख या बिंदूशी ४५° आहे. कख हें अंतर २७० पाद असल्यास बुरुजाची उंची काढा.

